


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका




जून १९६७ ● वर्ष २३ वे ● मूल्य १। रु.

## श्रेयनामावलि–



दलाल आर्ट स्टुडिओ . ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

Gram : Dalalart
टे नं. ३५७७६५

● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. **या प्रतीस किंमत** १। रु. + रजि. **पोस्ट** ५५ **पैसे. वार्षिक वर्गणी**, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अविकृत मतें असतातच असें नाहीं.
प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत
Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay - 4.

अनुक्रमणिका

# दीपावली

**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५
तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिन्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

# महाराष्ट्र धर्माची जोपासना

**ग्रीष्माने** तापलेली ही धरित्री वरुणाची आतुरतेने वाट पहात आहे. गतवर्षी वरुणाने मराठी धरतीला खूपच मोठी झुकांडी दिली होती. यंदा काय? अगदी तशाच प्रकारची स्थिती सामान्य मराठी माणूस आणि रोजगार यासंबंधी झाली आहे.

महाराष्ट्राची निर्मिती होऊन सात पावसाळे लोटले. आठवा उंबरठ्यावर आहे. पण मराठी माणसाच्या वाट्याला जगण्यापुरती तरी ओल मिळणार आहे का? केंद्रीय आणि प्रांतिक शासन, स्वायत्त शासनसंस्था, महामंडळ, मोठमोठे खाजगी उद्योगधंदे यातील 'मराठी माणूस' नाहीसा होत चालला आहे. मुंबई पुण्यासारखी अस्सल मराठी संस्कृतीची केंद्रे नष्ट होऊ लागली आहेत. मराठी जीवन, मराठी संस्कृतीचा छाप अंग्रेजीच्या पोतेऱ्यामुळे भराभर पुसला जात आहे. कारणे दोन. एकतर वर नमूद केलेल्या सर्वच क्षेत्रात मराठी माणसाला त्याच्या कर्तबगारीनुसार हक्काने स्थान मिळेल अशी प्रत्याप्रत्यक्ष सोय शासन तसेच उद्योगपती यानी केलेली नाही. दुसरे म्हणजे मराठी माणसाची सोशिकता. पण सोशिकता संपत आलेली आहे. उभा मराठी समाज ढवळून निघत आहे. रोजगार उद्योगधंदा मिळविण्याचा घटनेने दिलेला मौलिक प्राथमिक हक्क सत्ता-संपदेच्या गट्टीने पायदळी तुडविला जात आहे. त्यातूनच चीड, मत्सर, सूड यांचे स्फोट होण्याची साधार भीति वाटू लागली आहे. देशाचे दृष्टीनेही ते घातक आहे. पण करणार काय? मुंगी अगदी नकळत चिरडली जाते. पण तीही तेवढ्यातल्या तेवढ्यात कडकडून चावण्याचा प्रयत्न करते. हत्तीसारखा बलाढ्य प्राणी ! - त्यालाही ती अक्षरशः लोळण घ्यावयास लावते. हे असे घडावयास कारण?

मराठी माणूस मनाचा तसा सरळ. पण बिथरला की कोणाचाच नव्हे तो, हे इंग्रजानी कॉंग्रेसच्या संस्थापकांचे व नंतरच्या तीन पिढ्यातील नेत्यांचे गळी पूर्णपणे उतरवले. झाले. राष्ट्रभक्तीच्या आवाहनाने मुंबई इलाख्याने इंग्रजीला तिलांजली दिली ती कायमचीच. आम्हाला मोठेपणा देऊन आमच्याच तुटपुंज्या साधन संपत्तीवर इतरांचे संसार मांडण्यात आले. नि त्यांचे आसन आता इतके पक्के झाले आहे की त्यांच्या स्पर्धेत, त्यांच्या डावपेचात मराठी माणसाची मान मुरगळली गेली आहे. तो अखेरचे श्वास मोजीत आहे. भाषावार प्रांतरचना होऊनही आपल्याच प्रांतात उपरे बनण्याची वेळ मराठी माणसावर आली याचे मुख्य कारण असे की व्यवहारातील त्याच्या अस्तित्वाची दखलच 'कॉस्मॉपॉलिटन ' व 'इंटर नॅशनल' स्वप्नरंजनात मशगूल झालेल्या सत्ताधारी पक्षाने घेतली नाही. उलट इतर राज्यातून तेथील स्थानिक जनतेचे हित अगदी दुराग्रहाच्या टोकापर्यंत जाऊनही जोपासले गेले व जात आहे. आणि यथा राजा तथा प्रजा हाच जगाचा न्याय आहे.

शासक आणि भांडवलदार यांचेवरील जबाबदारीप्रमाणेच मराठी माणसाची स्वतःचीही अशी काही जबाबदारी आहे. शक्य असेल तर त्या त्या सर्व ठिकाणी आपल्या बांधवाला पहिली संधी कटाक्षाने देण्याचे बंधन सामान्य उद्योगधंदे, दुकाने वगैरे चालविणाऱ्या मराठी माणसांवरच आहे. आपल्या माणसातील दोष जाणून ते दूर करण्यासाठी आधी त्याला कामाला वाव दिला पाहिजे, त्याला प्रोत्साहन दिले पाहिजे. तात्या पंतोजीसारखा शिक्षेचाच धाक घालण्यापेक्षा त्याचेवर जबाबदारी टाकून त्याचेकडून काम करवून घेतले पाहिजे आणि हे सारे झपाट्याने घडले पाहिजे.

प्रगतीची वाट खडतर असते. याची जाणीव ठेऊन आपण सर्वांनी आपापल्या क्षेत्रात पारंगत होण्यासाठी पैसा वा बढति यांचीच अभिलाषा न बाळगता कष्ट उपसले पाहिजेत. मालक, अधिकारी, कारकून, कामगार, शिक्षक, किसान, माता-पिता या सर्वांनीच हे सामाजिक कर्तव्य चोखपणे बजावले तरच मराठी माणूस समृद्ध, संपन्न होईल. त्यातून महाराष्ट्र आणि भारताचा नवा इतिहास घडेल. हक्काप्रमाणेच कर्तव्याची जोपासना आपण करणे जरुरी आहे. 'आधी केले, मग सांगितले' असे आपण सर्वांनी वागण्यास प्रारंभ करावा. आणि 'मराठा तितुका मेळवावा, महाराष्ट्र धर्म वाढवावा' ही श्री समर्थांची शिकवण यथार्थाने सिद्ध करून स्वहित तसेच राष्ट्रहितही साधले पाहिजे. तरच 'महाराष्ट्र' या शब्दाला अर्थ, वजन आणि घनता प्राप्त होईल.

– संपादक



अनुक्रमणिका






**BIOGRAPHY OF SHRI LAD**

J. C. Mathur, I.C.S.,
Addl. Secretary (Agriculture),
4, Lytton Lane,
New Delhi.
14th April, 1967.

Dear Sir,

I thank you for your letter of 3rd April, 1967, and for sending me a copy of the April issue of your journal 'DIPAVALI' in which you have published a Marathi translation of the biographical sketch of Shri Lad that I had written in Hindi.

I am glad to know that you liked the article and I am happy that you could bring it to the notice of Marathi readers. Shri Lad made a strong impact upon me when we were together in the Ministry of Information & Broadcasting and his memory will abide with me undimmed.

I think, your Marathi readers may also like to read renderings of other biographical sketches in my book 'DAS TASVEEREN'. There is a biographical sketch on the late Dr. Altekar among others.

Yours sincerely,
J. C. Mathur

## करुण, आर्द्रतेने चिंब लेखणी

स. न. वि. वि.

आपला संगीत विशेषांक चाळताना सहज गेल्या वर्षीच्या अंकाचे स्मरण झाले. तुलनेचा मोह झाला नाही. पण एक गोष्ट विशेषत्वाने जाणवली, ती अशी की गेल्या वर्षी जरा मोठ्या नांवाचे टोप-पदर अंकाला लाभले. यंदा तसा नांवांचा सुकाळ नसल्याने आपले संपादन कौशल्य किती जागरूक, स्वयंपूर्ण बनण्याची कोशिस करीत असते याचा ठळक पडताळा मिळाला. लो. टिळक यांचा संगीतावरचा औचित्यपूर्ण लेख, मजेदार बारीक आठवणी आणि किस्से, त्याचबरोबर नामवंतांचे छोटेखानी पण उद्‌बोधक मतप्रदर्शन.

परंतु मला सर्वात जर कशाने मोहिनी घातली असेल, तर जितेंद्र अभिषेकी यांच्या गानकोकिळा लता मंगेशकर यांच्यावरील चित्तस्पर्शी रसदार लेखाने. लताबाईंच्यावर वरेच लिहिले गेले त्यातले अपेक्षा भंग करणारे मोठ्यांचे लेखच अधिक निघावे. जितेंद्र अभिषेकींच्या लेखणीला करुण आर्द्रतेत चिंब होण्याचा दर्दी गुण आहे, हे त्यांच्या कथा वाचून माझ्या प्रत्ययास आले होते.

पण ललितेतर लिखाण ते कुठपत रसार्द्र करतात, याबद्दल त्यांनी 'महाराष्ट्र टाईम्स' मधे जो लेख लताबाईंवर लिहिला होता, तो वाचून माझ्या मनात, शंका निर्माण झाली होती. पण 'दीपावली'तला त्यांचा लेख वाचला आणि तोंडातून उद्‌गार आले की, 'अभिषेकींनी साऱ्यांना साफ निजविले.' त्यांच्या संगीताला नि संगीत दिग्दर्शनाला वाहवा अशी दाद दिल्याखेरीज राहवत नाही, तसेच 'दीपावलीत'ल्या लताबाईंवरील त्यांचा लेख वाचून माझी स्थिति झाली. त्यांचे, आणि असा लेख सादर केल्याबद्दल आपले, असे दोघांचे आभार आणि अभिनंदन.

**वांद्रा (पूर्व), मुंबई ५१ – दा. गो. देशपांडे**

## मातोश्रींना झालेला संतोष

स. न. वि. वि.

आपण पाठविलेला दीपावलीचा संगीत-विशेषांक सर्वांगसुंदर आहे. त्याबद्दल आपले अभिनंदन ! लो. टिळकांचा अग्रलेख व श्री. जोशी यानी लिहिलेला 'कविंद्र रविंद्र व श्रीछत्रपति शिवाजी महाराज हे लेख विशेष उल्लेखनीय आहेत, यात शंका नाही.

माझ्या पू. पिताजींच्या आठवणीना आपण दिलेले स्मृतिगान हे शीर्षक अतिशय योग्य आहे. आपण केलेल्या सहकार्याबद्दल पुन्हा आभार. आमचे मातोश्रींना तर फारच संतोष झालेला आहे.

एक छोटीशी सूचना अशी की प्रूफ-रीडिंग आणखी सुधारले गेले असते. त्यादृष्टीने स्कोप आहे. आशा आहे, पुढे योग्य ते प्रयत्न त्याकरता केले जातील. कळावे.

**कलकत्ता–२६ –विजय पेठे**




## सर्वांगसुंदर संगीत अंक

सादर प्रणाम,

'दीपावली'च्या 'संगीत' अंकाबद्दल लिहीन म्हणताना राहूनच जात होतं. तशात वेळ व लिहिण्याचा 'मूड' यात मेळ कुठे जमतो आहे? अंक छान जमला आहे. अगदी रंगतदार मैफलीसारखा—ही मैफल जमविणारे आहेत जितेंद्र अभिषेकी व श्री. भोबे (डे) यांच्या सारखे प्रतिभावंत व प्रज्ञावंत. कां जमू नये? आजच काही कामानिमित्त सौ. पद्माताई सहस्रबुद्धे यांजकडे गेलो होतो. त्यांच्या टेबलावरील 'दीपावली'चा अंक ठळकपणे नजरेत भरत होता. सौ. पद्माताईंनी तो हातात घेऊन चाळत मला म्हटले 'दीपावली'चा संगीत अंक सुंदर निघाला आहे बाकी!...आणि मला खरंच 'दीपावली' संगीत अंकाची आठवण झाली. नेहमीच्या धडाक्यात एक सुसंवादी स्वर उमटल्यावर भाववृत्ती सगळ्या बदलून गेल्या आणि हे पत्र तसेच लिहायला बसलो. लिहिले ते मनःपूर्वक लिहिले आहे.

**विलेपार्ले –प्र. श्री. नेरुरकर**

## बिहार दुष्काळ निवारण निधीला सढळ हाताने मदत करा

१




मूळ ले. – कै. टी. पी. कैलासम्
स्वैर रुपांतर
प्रा. श्री. र. भिडे

**[ पात्रपरिचय ]**

**सुदेष्णा, कीचक, सैरंध्री, उत्तरा, बृहन्नल, बल्लव
सम्राट विराट, कंकभट**

[ कीचक विजय संपादन करून राजधानीस परत आलेला पाहून राजदूत राजनगरीच्या प्रवेशद्वाराशी तुताऱ्या वाजवून त्याचे स्वागत करीत आहेत. 'युवराजांचा जयजयकार असो!' असा आवाज राजमार्गावर उसळलेल्या गर्दीतून सारखा येत आहे. 'विजयशाली कीचका, प्रचंड लूट घेऊन राजधानीस येणाऱ्या तुझे स्वागत असो' 'सेनाधिपतींचा जयजयकार असो'–अशाहि आरोळ्या ऐकू येतात.

कीचक एका शृंगारलेल्या हत्तीवर अंबारीत बसला असून जनतेच्या स्वागताचा स्वीकार करीत करीत नृत्यशाळेच्या पायऱ्यांजवळ येतो. त्याच्या बरोबर मोठा लवाजमा आहे. राणी सुदेष्णा आपल्या सख्यांसह सामोरी होऊन त्यास वंदन करते...कीचक तिला वर उचलून तिच्या भालप्रदेशाचे चुंबन घेतो.. ती त्याच्या कपाळावर कुंकुमतिलक लावते. उत्तर, उत्तरा आणि दासींसह ती त्याला मंगळारती ओवाळते. ]

**सुदेष्णा**:–दादा ! हृदय ओसंडून बाहेर पडणारा उत्साह प्रकट करणारा आपल्या प्रजेचा हा जयघोष ऐकलास का? आनंद व्यक्त करण्याकरता हे लोक आपले हात कसे उंचावताहेत, ते पहा तर खरं! प्रजेचं तुझ्यावरचं हे प्रेम पाहिलं म्हणजे माझं मन किती भरून येतं म्हणून सांगू! गृहदेवतेला राजवाड्यात घेऊन येताना तू दिसलास म्हणजे तर हे नागरिक आनंदानं बेहोष होतील! स्वारीहून परतताना गृहिणीसह येणाऱ्या तुझे स्वागत करताना ही मत्स्यभूमि धन्य होईल! . . . परंतु तो सुदिन केव्हा उगवणार आहे कुणास ठाऊक !

**कीचक**:–ताई! जरा थांबशील की नाही! एवढी अधीर कां होतेस? अग मी तिला माझ्याबरोबर आणलं आहे...अग माझं लग्न झालं.

**सु**:–तुझं लग्न झालं! कधी?....केव्हा..? कुठं..? नि आम्हाला कळवलं सुद्धा नाहीस.....पण तरीहि मी रागावणार नाही...गृहलक्ष्मीला घेऊन तू आला असलास तर माझ्या आनंदाला सीमा नाही....कुठं आहे आमची वहिनी ?... तिच्या स्वागतासाठी मला पंचारती लावायला हवी... (आनंदातिशयाने लोकाना उद्देशून) या खेपेला दादा स्वारीहून एकटाच परत आलेला नाही वरं...वहिनीला घेऊन आला आहे.. तिच्या स्वागताची तयारी करा... माझ्या वहिनीला.. वहिनीला..कधी पाहीन असं झालं आहे मला..दादा! (कीचक मोठ्याने हसतो..संशयाने त्याच्याकडे पहात) कुठं आहे आमची वहिनी? तुझी निवड तरी पाहू दे..आम्ही जर तुझ्यासाठी एखादी मुलगी पाहिली असती तर तू तिच्याकडे एखादा तरी कृपा कटाक्ष टाकला असतास की नाही कुणास ठाऊक !.. कुठं आहे ती! सांग ना !

**की**:–(थट्टेखोरपणे हसून) वहिनी कुठं आहे म्हणून तूच का विचारते आहेस ताई? इतकी वर्षं जिला मी घेऊन येत असे तिलाच आजही घेऊन आलो आहे..दुसरी तिसरी कुणी नाही.. गेली पंचवीस वर्षं जिचं साहचर्य मला लाभलं आहे ती माझी गृहदेवता विजयलक्ष्मी...ती या घरात काही नवी नाही.. तरी पण तिच्या आगमनाप्रीत्यर्थ नृत्यशाळेत जाऊन आपण आनंदोत्सव साजरा करू या! ताई, मलाही या माझ्या सखीबरोबर नाचायचं आहे! प्रतिहारी–चला नृत्यशाळेकडं...नागरिकहो ! नृत्यशाळेकडे चला...

**सु**:–( लटक्या रागाने) जा..मी नाही बोलणार तुझ्याशी ! माझी शपथ आहे हं तुला..तू नेहमीच आमची आपली थट्टाच



अनुक्रमणिका

करतोस! पुष्कळ झाल्या तुझ्या या स्वाऱ्या आता..तू मिळवून आणलेल्या संपत्तीनं आपलं राज्य संपन्न झालं आहे.. स्वतःच्या मर्जीप्रमाणं अनुरूप मुलीची निवड करून यावेळेपर्यंत खरं म्हणजे तू संसाराला लागायला हवा होतास! अजूनहि काही वेळ गेलेली नाही.. आता तरी विवाहबद्ध होऊन इथंच सुखात रहावंस.. आपल्या प्रजेचीहि हीच इच्छा आहे. आजपर्यंत तू सर्व बाबतीत त्यांच्या इच्छेला मान देत आला आहेस, मग ही एवढी एकच इच्छा कां पुरवत नाहीस? किती तरी वर्षं झाली ही सारी प्रजा तुझ्या विवाहाची मोठ्या उत्सुकतेनं वाट पाहात आहे. तू त्यांच्या भावना दुखवू नकोस...दादा, ही प्रजेची इच्छा आहे...

**की**:—ताई...तुला सारं ठाऊक आहे..मी तुला कितीदा तरी सांगितलं आहे.. माझ्या आयुष्यात असा एक काळ होता की ज्यावेळी मी एखाद्या मुलीला माझं गृहिणीपद भूषित करू दिलं असतं...(थांबून) पांचालीचं स्वयंवर आठवतं तुला? आम्ही दोघं एकमेकास किती अनुरूप होतो, हे तुला ठाऊक आहे. द्रौपदीनं मलाच वरलं असतं. परंतु गदायुद्धाऐवजी लक्ष्यवेधाच्या पणाच्या रूपानं मला दैव आडवं आलं..आखाड्यात पाऊल टाकताच जेव्हा मी तिला पहिल्यांदा पाह्यलं, तेव्हाच माझे डोळे आणि मन तृप्त झाले..माझी नाडी क्षणभर बंद पडली..ती माझी खरी हृदयेश्वरी! ताई, पुढची सारी कथा तुला ठाऊकच आहे....नि त्याच वेळी मी प्रतिज्ञा केली की लग्न करायचं तर तिच्याशीच.. दुसऱ्या कुणाशीहि नाही..अरेरे पण आता हे बोलण्यात तरी काय अर्थ आहे..ज्या माझ्या बाहूंनी ही भक्कम गदा लीलेनं उचलण्यात सदैव आनंद मानला, त्यांना ते हलकंफुलकं धनुष्य उचललं नसतं असं थोडंच आहे.. माझ्या दृष्टीनं वास्तविक तो एक पोरखेळच होता..कीचकाला तो शोभण्यासारखा नव्हता.. धनुर्विद्येएवजी गदायुद्धानं स्वयंवराचा निर्णय लागायला हवा होता.. परंतु असं व्हायचं नव्हतं.. गेली पंचवीस वर्षं थिजलेल्या हृदयानं मी वावरत आहे.. दरसाल स्वाऱ्या करून प्रजेसाठी संपत्ति मिळवून आणण्यातच माझं मन आता रमलं आहे...ताई, झालं गेलं विसरून जा..माझ्या लग्नाची आता गोष्टच नको..लग्नाचं काही आता माझं वय नाही.. आजचा विचार करायला हवा..आपली उत्तरा आता उपवर झाली आहे. वयात आल्यानं ती आता कशी सुरेख दिसत आहे.. ये उत्तरे...अशी इकडे ये..ताई, यापुढं या घरात माझ्या लग्नाचा विषय बंद.. माझ्यासाठी एखादी मुलगी शोधून काढण्यापेक्षा हिच्यासाठी योग्य वर निवडून काढणे अधिक अगत्याचे आहे. उत्तरेसाठी मनपसंत वराची प्राप्ती ज्या दिवशी होईल, त्या दिवशी कीचकाचं हृदय आनंदानं नाचायला लागेल....या साऱ्याविषयी सावकाशीनं बोलू... हे सारे प्रजाजन, नेहमीच्या वहिवाटीप्रमाणं यशश्री घेऊन येणाऱ्या मला भेटण्यास मोठे उत्सुक झालेले दिसतात..त्यांची इच्छा पूर्ण करणं हे माझं पहिलं कर्तव्य आहे. पौरजन हो! चला नृत्यशाळेकडे....विजयश्री संपादून येणाऱ्या तुमच्या युवराजाचं कदाचित् हे शेवटचंच नृत्य असेल..त्यात समभागी व्हा....चला....



## कन्नड रंगभूमीचे भूषण
# कै. टी. पी. कैलासम्

Unfortunately in our country official position or a place in the University seems to be necessary for literary recognition. Kailasam cannot lay claim to either. He rather illustrates the tradition, that abuse criticism, exile, and fierce solitariness mark the man of genius. **या शब्दात राष्ट्रपति डॉ. राधाकृष्णन् यानी गौरवलेला एक प्रज्ञावंत नाटककार.**

## श्रीमंती झुगारून देणारा पुरुषोत्तम

**श्री. त्यागराज परमशिव कैलासम् यांचा जन्म बंगलोर येथे एका श्रीमंत घराण्यात २९ जुलै १८८५ रोजी झाला. त्यांचे वडील एक निष्णात् कायदे-पंडित होते. कैलासम् यांचे शिक्षण मद्रासला हिंदू हायस्कूल व प्रसिडेन्सी कॉलेजमध्ये झाले. नंतर त्यानी इंग्लंडला जाऊन भूगर्भ शास्त्राची पदवी प्रथम श्रेणीने मिळविली. तसेच त्यानी तेथे अनेक बक्षीसेही पटकाविली. अभ्यासाइतकाच खेळ आणि संगीताकडे त्यांचा ओढा होता. त्यांच्या तेथील सहा वर्षांच्या वास्तव्यात लंडनच्या रंगभूमीवरील एकाही नाटकाचा प्रयोग पाहण्याचे त्यानी चुकविले नाही. मायभूमीला परतल्यावर लठ्ठ पगाराची नोकरी त्यांची वाट पहात होती. परंतु त्यांच्या स्वतंत्र मनोवृत्तीला नोकरीची बंधने रुचण्या-**

सारखी नसल्याने त्यानी तिचा विचारही केला नाही. गर्भश्रीमंत घराण्यातील जन्म व सरस्वतीचा वरदहस्त असूनहि त्याना गरीबीचेच जिणे रुचत असे.

विसाव्या शतकाच्या प्रारंभी कर्नाटकाच्या व्यावसायिक रंगभूमीवर जे नाट्यप्रयोग सादर केले जात त्यात नाट्यगुणापेक्षा भडकपणा, कृत्रिमता, प्रौढ शैली आणि अतिरंजितपणा यांसच प्राधान्य दिले जाई. पौराणिक कथांना या नाट्यकृतीतून अत्यंत हिणकस स्वरुप प्राप्त झाले होते. कैलासम् यानी १९१९ साली नाट्यलेखनास प्रारंभ केला आणि 'नम्म कंपनी' या नाटकात या रूढ बेगडीपणाचा विलक्षण उपहास केला. कर्नाटकातील प्रेक्षकांची दृष्टि जी केवळ पौराणिक कथातच रमत होती त्यांना आपल्या प्रतिभेच्या सहाय्याने कैलासम् यांनी सामाजिक व कौटुंबिक विषयात रस घ्यावयास लावला. मध्यमवर्गियांच्या जीवनातील अनेक प्रसंगांतून दडून राहिलेल्या नाट्याचे दर्शन त्यांनी घडविले. नाटकातील पात्रांची भाषा रोजच्या व्यवहारातील बोली भाषाच असावयास हवी म्हणजेच इच्छित परिणाम घडवून आणता येतो हे आपल्या लेखनानी त्यानी पटवून दिले. काही परंपराभिमानी उच्चभ्रूंकडून प्रारंभी त्यांना विरोध झाला असला तरी थोड्याच अवधीत आपल्या लेखनाची छाप त्यांनी वाचक–प्रेक्षकांवर बसविली. कर्नाटकाला एका नव्या धर्तीच्या नाटकाची गोडी त्यांनी निर्माण केली. A. D. A. ; छाया आर्टिस्ट बंगलोर आणि महाराजा कॉलेज माजी विद्यार्थी संघ, म्हैसूर यांनी त्यांच्या अनेक कलाकृति समर्थपणे सादर केल्या.

कैलासम् यांच्या नाटकाचा वाचक–प्रेक्षक वर्ग फार मोठा आहे. कथानकाच्या गुंतागुंतीपेक्षा प्रभावी कोट्या, संवादातून खळाळणारा विनोद व त्यातील गंभीर आशय यामुळे त्यांची नाटके सुशिक्षित समाजात फार लोकप्रिय झाली. त्यांच्या सर्वच कलाकृतीतून यांत्रिकतेतील गुंते, वळणे व त्यांच्या मख्ख्या यथार्थपणे चित्रित करण्याचे त्यांचे असामान्य चातुर्य आणि विनोदी शैलीने विषयाला भव्य स्वरुप प्राप्त करून देण्याचे सामर्थ्य दिसून येते. कैलासम् यांचे स्नेही श्री. बी. एस्. रामराव यांच्या स्मरणशक्तीच्या आधारे श्री. जी. पी. राजरत्नम् यांनी 'कीचक' या नाटकाची पुनर्रचना केली.

कैलासम् यांनी एकूण सतरा नाटके लिहिली. त्यापैकी पंधरा कानडी व दोन इंग्रजी होत. कन्नड साहित्य परिषदेचे अध्यक्षस्थान त्यानी १९४५ मध्ये भूषविले. त्यांचे विचार सनातनी व परंपरागत भासले तरी त्यांची कृति मात्र क्रांतिकारक आहे. 'कन्नड-प्रहसन–पितामह' या नांवाने त्यांचा यथोचित गौरव झाला आहे. गांधीजींच्या विचारप्रणालीचा मनावर बराच संस्कार झाला होता. दैनंदिन व्यवहारातील बोली भाषा तसेच इंग्रजी शब्द व वाक्प्रयोगांचा सर्रास उपयोग करण्याची हौस आणि सहज विनोद साधण्याचे सामर्थ्य हे त्यांच्या लेखनशैलीचे विशेष. त्यांच्या गुणांची योग्य ती बूज राखली गेली नाही याविषयी हळहळ व्यक्त करीत असतानाच राष्ट्रपति डॉ. राधाकृष्णन् यानी त्यांचा गौरव प्रारंभी दिलेल्या मार्मिक शब्दानी केला होता. कैलासम् हे १९४६ साली वयाच्या ६१ व्या वर्षी निधन पावले.

[तालानुरूप पावले टाकत नागरिकांसह तो नृत्यशाळेकडे वळतो..नृत्यशाळेच्या प्रवेशद्वाराशी उभ्या असणाऱ्या उत्तर आणि उत्तरा यांना तो जवळ घेतो. नृत्यालयातील भिंती नृत्यातील विविध आकृतीनी सुशोभित केल्या असून निरनिराळ्या तंतूवाद्यांचे सूर आणि पडघमच ताल यांयोगे सारे नृत्यालय निनादून गेले आहे. नृत्यालयातील रंगमंचाभोवती सारे प्रजाजन स्थानापन्न होत असून तेथील उत्साहजनक वातावरणाने कीचक नाचू लागतो. त्याच्या प्रत्येक हालचालीचं, पदविन्यासाचं सारे जण टाळ्या वाजवून कौतुक करतात आणि–'धन्य! धन्य!! आमच्या ह्या नरपुंगवानं तर कमालच केली. नाट्याचार्यांचा जयजयकार असो!.. हे असेच दीर्घकाल....आमरण ..कल्पांतापर्यंत नाचत राहू दे,' असे प्रशंसोद्गार ऐकू येतात.. नृत्याच्या शेवटच्या फेरीत तो मुलांसह खाली वाकतो आणि कुरळे केस असलेल्या मस्तकाने आणि कटीवर दोन्ही हात ठेवून जमिनीवरच्या मुलायम गालिचाला स्पर्श करतो, आणि ओरडून मद्याची मागणी करतो–]
कोण आहे रे तिकडे..मद्यपात्र सत्वर आणा.. (स्वतःशीच पुटपुटत) या वयात मी लग्नाला उभं राहू? माझ्या लग्नाविषयीची बोलणी ऐकण्याचा मला वीट आला आहे... बस झालं हे आतापर्यंतच जिणं.. जगण्याचं सुख भरपूर मिळालं आहे मला, आता मरणाची गोडी जर कोणी मिळवून दिली तर मला हवी आहे..

[जवळच उभ्या असलेल्या सैरंध्रीला सुदेष्णा मद्याचा चषक कीचकाला देण्याची खूण करते. कां कू करीतच ती मद्याचा चषक कीचकाला देऊ लागते. ..तोंड न फिरवताच कीचक जेव्हा तो घेऊ लागतो तेव्हा तिच्या हाताची थरथर सुरू होते. सारेच शरीर कंपायमान होते आणि चषकातले थोडेसे मद्य हिंदकळून त्या स्वच्छ व मऊ गालिच्यावर पडते... यामुळे कीचकाला आपले तोंड तिच्याकडे फिरवणे भाग पडते. तिला पाहताच त्याच्या हृदयात एक विलक्षण कळ येते व नकळत त्याचा डावा हात हृदयाकडे वळतो... लगेच स्वतःला सावरून तो मद्याचा चषक घट्ट धरतो नि सावकाश ओठाजवळ नेतो. अनेक वर्षांपूर्वी अनुभवलेल्या प्रसंगाचे दृश्य त्याच्या डोळ्यासमोर तरळते..आपण मुलांबरोबर नाचत आहोत हेही तो क्षणभर विसरतो. शरीराला एक झटका देऊन समोर चाललेल्या एका नृत्याकडे तो आपले मन वेधण्याचा प्रयत्न करतो.. परंतु पुनः पुन्हा तो स्वतःशीच पुटपुटतो–'हिला मी पूर्वी पाह्यल्यासारखं वाटतं.. कधी तरी, कुठं तरी... पण निश्चित केव्हा? (पुन्हा स्वतःला सावरत) छेः छेः माझं आता वय होत चाललं आहे.. या वयात.. धिक्कार असो माझा.. (जणू काही तिचा विचार निपटून टाकत) ते एक स्वप्न होतं.. पण त्याचं आता काय? (याच वेळी उत्तरा एक नवा नृत्यप्रकार सुरू करते, तिच्याकडे त्याचे लक्ष जाते नि तो ओरडतो).. मुली, स्वतःला नीट सांभाळ.. हा पदविन्यास नवाच दिसतो आहे.. तुला तो शिकवल्याचं आठवत नाही मला..

उः–(एका वेगळ्याच उमाळ्याने) मामा, तुम्ही नाही शिक-

वला हा.. हाच का आणखी किती तरी नृत्याचे प्रकार आमच्या नव्या नाट्याचार्यांनी शिकवले आहेत मला. पाहिजे तर आईला विचारा.. त्यांच्या निरुपम कलेविषयी..

**की**:–(सुदेष्णेकडे संशयाने पहात ) ताई, माझ्या अनुपस्थितीत इथं काय काय घडामोडी झाल्या आहेत त्या सांग तरी.. हे नवे नाट्याचार्य कोण? कोठून आले? तुझ्या या नव्या व्यक्तीबद्दल काही सांगशील की नाही?

**सु**:–दादा! रागावू नकोस हं! स्वाऱ्यांच्या नादात वर्षं न् वर्षं तू मुळी राजधानीबाहेरच असतोस. आवडत्या व्यवसायात लक्ष घालण्यास तुला वेळ तरी कुठं मिळतो? तुझ्या मनाप्रमाणं आणि नांवाला व ज्ञानाला शोभेल अशा रीतीनं नृत्य शिकवत तू नेहमीच इथं राहावंस म्हणून तर मी तुला लग्न करण्याचा सारखा आग्रह करते आहे. व्हायच्या गोष्टी वेळच्या वेळेवरच व्हायला हव्या.. तू इथं नसलास म्हणून नृत्यशाळा बंद थोडीच ठेवता येते.. तू इथं नसतोस म्हणून तर दुसऱ्या आचार्यांना इथं आणावं लागलं.. पण दादा! माझ्या सुदैवानं विशेष खटपट न करता अगदी थेट तुझ्यासारखेच दुसरे आचार्य आम्हाला लाभले आहेत.. तुझ्याहून ते थोडे कृश आहेत.. पण नृत्य करायला लागले ना की अगदी हुबेहूब एखाद्या स्त्रीसारखे दिसतात......मूर्तिमंत अप्सराच..

**की**:– वा! अप्सरेप्रमाणं दिसणारा पुरुष! मग ह्या साक्षात् नरनारी अवताराला पाह्यलाच हवं मला.. ते जर इथंच जवळपास असतील तर बोलाव त्यांना! [सुदेष्णा एका सेवकाला त्यांना बोलावून आणण्यासाठी खूण करते. तो बाहेर जाऊन लगेच येतो. थोड्याच वेळात अडखळत अडखळत पाऊले टाकत अस्वस्थ चित्र व भयभीत मुद्रा असलेला बृहन्नल बाजूच्या दरवाजाने प्रवेश करतो. बृहन्नलाच्या आकर्षक पावलांवर कीचकाची दृष्टि खिळली आहे. नृत्यालयाच्या मध्यभागी येताच बृहन्नल थांबतो आणि जेव्हा तो नम्रतापूर्वक वंदन करतो तेव्हा कीचकाची दृष्टि त्याच्या पावलावरून देहाकडे व चेहऱ्याकडे फिरू लागते. त्याच्या दृष्टीतून आदराची भावना व्यक्त होत असली तरी बृहन्नल मात्र हताश दिसत आहे. कीचकाकडे पाहताना त्याच्या डोळ्यातील मिस्किल चमक कळू शकते...]

**की**:–(स्वतःशीच) ताई म्हणते त्याप्रमाणं हा पुरुष स्त्रीसारखा दिसतो खरा. पावलं टाकण्याची ढब तर अगदी बायकी.. ह्याला जर मी या नृत्यशाळेत पाह्यलं नसतं तर पुरुषाकृति धारण करणाऱ्या एखाद्या सुकुमार धनुर्धरालाच तर मी पहात नाही ना, असा भास खासच झाला असता... (प्रकट) तुम्ही जर नृत्याकडे वळला नसता तर ख्यातनाम पार्थाप्रमाणं एक आदर्श धनुर्धर

झाला असता, यात शंका नाही.. (सुदेष्णेला उद्देशून) काय ग ताई, हल्ली तो पार्थ असतो तरी कुठं? तुला काही त्याची माहिती आहे का? शत्रुत्व निर्माण करून धार्तराष्ट्र त्याच्याशी लढण्याची खूप खुमखुमी दाखवत परंतु खरं सांगायचं म्हणजे आप्तेष्टांच्या रक्तात अग्निबाण घुसवून स्वतःच्या पराक्रमाची तृष्णा भागवण्याची संधि न मिळाल्यानं तो कुठल्या तरी वनात खितपत पडला असावा. पांडवाच्याबद्दल अलीकडे तू काही ऐकलंस का?... गरीब बिचारे.. आणि त्यांची बायको.. पतिव्रता धर्माला अनुसरून तिनंहि ज्यांच्याबरोबर वनवास पत्करला... तीच केवळ माझ्या मनाजोगी स्त्री होती.. स्वयंवराच्या वेळी मलाच वरण्याचं तिच्या मनात होतं असंहि मी ऐकलं आहे.. आणि तसं असलं तर त्यात विशेष आश्चर्य वाटण्यासारखं काय आहे? कीचकाला पाहून कोण भुलणार नाही? बलरामाचा आवडता शिष्य असा जो मी अजिंक्य कीचक...त्याच्याशी विवाहबद्ध होण्याची इच्छा कोणती स्त्री बाळगणार नाही? मी तर राहूच दे.. पण आमच्या गुरूच्या शिष्यांपैकी भीम, सुयोधन, सात्यकी, जरासंध... यांच्याशी लग्न करण्याची तळमळ नसणारी स्त्री विरळा... गदेचं शिक्षण देत असतानाच गुरूंनी आम्हाला नृत्यहि शिकवलं... माझा पदविन्यास पाहून ते इतके संतुष्ट झाले की त्यांनी मला 'नाटयाचार्य' ही पदवी दिली... ताई तिनं जर माझा आपण होऊन स्वीकार केला असता तर या प्रासादाची प्रतिष्ठा आणि माझ्या मनाची प्रसन्नता किती वृद्धिंगत झाली असती म्हणून सांगू! परंतु दैवाचा खेळ वेगळा होता.. मन योजतं एक आणि होतं भलतंच हेच खरं.. मी जेव्हा माझी भक्कम गदा घेऊन द्रौपदी—स्वयंवरमंडपात प्रवेश केला तेव्हा टाकलेल्या प्रत्येक पावलागणिक माझं हृदय आनंदानं नाचत होतं.... माझ्या त्या अवताराकडे पाहून पृथ्वीवरील कोणत्याहि माणसाचा भीतीनं थरकाप झाला असता, परंतु ती... बिलकूल भ्याली तर नाहीच... उलट तिच्या चेहऱ्यावर माझ्याविषयीचा आदर स्पष्ट दिसत होता नि त्याच वेळी क्षणभर मला माझी नाडी बंद पडल्यासारखी वाटली.. तिनं जणु काही माझा श्वासच रोधला होता, हृदय काबीज केलं होतं.. ताई, तिचा पत्नी म्हणून स्वीकार कुणी केला हे तुला ठाऊकच आहे... पार्थ! माझ्याप्रमाणंच त्याचेहि केस कुरळे होते.. एखाद्या स्त्रीला शोभणारा त्याचा पदविन्यास.. तो धनुर्धर.. तिसरा पांडव.. (बृहन्नलावर नजर रोखून) आँ.. मला तर क्षणभर असं वाटलं की इथं उभे आहे तोच तर तो नाही ना! आणि म्हणूनच मी म्हटलं की तुम्ही जर नृत्याकडे वळला नसता तर खचितच पार्थासारखा महान् धनुर्धर झाला असता.. आमच्या ताईनं जे तुमचं वर्णन केलं ते अगदी सार्थच आहे. तुम्ही पुन्हा नाचायला सुरुवात करा ना! तुमचं नृत्य म्हणजे आमच्या नेत्रांचा उत्सव आहे.. करा प्रारंभ....

[कीचकाच्या तोंडून ज्या ज्या वेळी 'पार्थ' या अक्षरांचा उच्चार होई त्या त्या वेळी 'आता आपण खात्रीने ओळखले जाणार' अशी सारखी भीति बृहन्नलाला वाटे, तरीहि आपले सारे धैर्य एकवटून उत्तर आणि उत्तरा यांसह तो पुन्हा नाचू लागतो. त्याच्या पावलावर दृष्टि खिळवत कीचक सुदेष्णेला उद्देशून—] ताई, हे तुझे नाटयाचार्य, आपल्या विद्येत खरोखरच निष्णात आहेत यात शंकाच नाही. तुझी निवड निश्चितपणे उत्तम आहे. पण काय ग हे कोण? इथं आले कसे? तुला काही माहिती आहे का? यांना पूर्वी पाहिल्याचं किंवा त्यांच्या संबंधी काही ऐकल्याचं तर बिलकूल आठवत नाही. यांची ऐट तर पहा! सारं शरीर सुद्धा किती लवचिक आहे. हिमाच्छादित पर्वतराजींवर संचार करणाऱ्या किरातांच्या पावलावर पाऊल टाकणारी यांची ही ढब पाहिली की माझा गुरुबंधु-तो वृष्णीवीर-ज्याच्या मुरलीच्या मधुर रवानुसार नाचणाऱ्या द्वारकेच्या गोपींच्या रासक्रीडेची आठवण व्हावी त्याची मूर्ति तरळते नजरेसमोर. मी लहानपणापासूनच माझं लक्ष गदेवर केंद्रित केल्यानं अशा स्त्रीला शोभून दिसणाऱ्या ललित पदविन्यासाकडे दुर्लक्ष केलं पण आता वाटतं की पुन्हा लहान व्हावं नि अजूनहि हे शिकावं....या आचार्यांप्रमाणेच आपणहि मुलांना शिकवावं. त्यांना या विद्येत प्रवीण करावं.. ताई, माझी खात्री आहे की या नव्या आचार्यांच्या हाताखाली आपल्या मुलांना जर कायम शिकण्याची संधि मिळाली तर ती या मत्स्यभूमीची आराध्य दैवतं होतील.. हे कायमच इथं राहतील अशी व्यवस्था कर नि ह्यांच्या योगक्षेमाकडं जातीनं

[ पृष्ठ ५६ वर पहा ]



**स्वा. सावरकरांचे हृद्गत्--**

द्यावयाला सद्गती
  आयुला मी पूजिलें
कल्पनेने रम्य जें
  तेंच मी रेखाटिलें ! . .
जीवनीं चैतन्य जीं
  ती प्रभा मी पाहिली
पूर्णतेला ये निशा
  गंधस्वप्ना साउली . .
वेंचिलें आकाश हे
  रंगलें जें श्रावणीं
गायिलो आकंठही
  निर्झराचे गीत मी ! . .
भैरवीचे चांदणें
  सूर घेते, --सर्वऽें
वेगवेडया मानसीं
  तृप्ततेची पाऊलें ! . .

—पै. रा. सनपूरकर










अनुक्रमणिका



## जितेंद्र अभिषेकी

**धुरकटलेली** संध्याकाळ रात्रीत बुडून गेली. बाजबहादूराने नव्यानेच बांधलेल्या महालातील शय्यागार. याच महालात रूपमतीने लग्नानंतरची सुहाग रात घालविलेली. धुंद होऊन... बेहोष...

आजदेखील हा महाल त्या रात्रीसारखाच फुलानी, माळानी सजविलेला. रोशनदानातून सगळीकडे ठिबकणारा रंगीबेरंगी प्रकाश. दरवाज्यावर व झरोक्यांवर कलाकुसरीने गच्च भरलेले निळे पडदे. पलंगावर अत्तरात बुडवून काढलेले गुलाब व मोगरे इतस्ततः विखुरलेले. मखमाली मसनद. आणि आसनावर ठेवून दिलेली वीणा व सितार... सगळं काही त्या पहिल्या वहिल्या रात्रीसारखेच. जणु ती रात्र पुन्हा एकवार उभी होती. सजली होती. अवतरली होती. कोपऱ्यात ठेवलेल्या भल्या मोठ्या चांदीच्या धूपदाणीतून सहस्रमुखानी धुपाचा सुगंध पसरत चालला होता. सोन्यान आणि रत्नाने मढलेला महालाचा दरवाजा आतून बंद होता. आणि...आत..आत... त्या महालाची स्वामीनी अनिमिष दृष्टीने त्या महालाकडे नजर लावून उभी होती. न्याहाळत होती. त्या भव्य महालात पसरलेल्या झुंबरातील प्रकाशालाहि लाजविणारी जणु काही ज्योतच. आपादमस्तक भरजरी आभूषणे चढविलेली. परंतु चेहऱ्यावर मात्र गहन अशी नीरवता. सोन्याच्या तंतूने मढवलेल्या तिच्या वासंति चूंदरीतून तिचे तारुण्य ओसंडत होते. जशी काही नवागता नववधूच. आणि चेहऱ्यावर मात्र वेदना. रोम रोम विकल आणि विव्हल. अंतःकरणात हाहाःकार. मनात भरकटणारा तो भूतकाळ. हाच ना तो महाल ! इथंच.याच ठिकाणी ती कुणाच्या तरी हृदयाची स्वामीनी झाली होती. कुणाची तरी राणी बनून तिनं प्रवेश केला होता. ती सगळ्या मांडूची महाराणी झाली होती. आणि सुख तर हजारो हातानी तिला हृदयाशी कवटाळून हळूच कानात सांगत होतं की, "मांडू काय घेऊन बसलीस, तू तर त्रैलोक्याची राणी!" कुठं ते सारंगपूरच्या एका छोट्या कस्व्यातील ठाकूराचे घर! तिला तर स्वप्नातहि वाटले नव्हते की, ती मांडूच्या सुलतानाची स्वामीनी होईल. तिची ती कबूतरी रजपूत जमात. नृत्य व संगीतात गेलेले बालपण. अनुपम असे देवाने दिलेले लावण्य. त्यामुळे बऱ्याच अफीमची ठाकुरांची तिच्यावर नजर आणि संगीताने भरून गेलेली ती गढी. रेवाशंकराचे देऊळ...

शरदऋतूतील मध्यान्ह. रेवाशंकराच्या



मंदिरातून येणारे ते सूर ऐकून बाजबहादुर शिकार सोडून मंदिरात घुसला. आणि रूपमतीच्या जीवनातहि. रूपमतीची यौवनसुलभ चंचलता उफाळून वर आली. प्रणय आणि कलेचे दोन भक्त देहभान विसरून गेले. समर्पण आणि प्रेम यांच्या पायाशी उच्च, नीच, जाति-धर्म, यांची बाधाच राहिली नाही. संभव असंभवाचा विचार आला नाही. या प्रेमाचे प्रतीक म्हणून बाजबहादुरने

रूपमती आणि तिच्या प्रियाचे मुक्त हास्य इथंच का भरून राहिले होते!... महालाच्या दरवाज्याआडून एक उच्छ्वास उमटला आणि घुटमळून घुटमळून विरून गेला.

महालाच्या झरोक्यातून दोन डोळे जळणाऱ्या माळव्याकडे पाहू लागले. मांडूच्या पायथ्याशी आदमखांच्या छावणीत आरडा ओरडा चालू होता. सारंगपूरच्या मैदानात पसरलेले बाजबहादुरच्या

माझ्या देहाला लागणार ना?" रूपमतीने आपल्या शेजारी पडलेल्या कटयारीला हात घातला.

"राणीसाहेब!"

"शयनागारावरील रक्षक सुलेमानखांचा तर हा आवाज."

"रानी साहिबा!"

"क्या बात है?" रूपमतीने आतनच विचारले.

"सरदार रायचंद आपणास भेटू इच्छितात."

रूपमती आश्चर्याने उठून उभी राहिली.

रायचंद बाजबहादुरचा परम स्नेही आणि मांडूचा दरबारी गायक होता. आदमखाँबरोबरील युद्धात रायचंद पकडला गेला होता.

# ना | रा | य | णी

**....क्षणार्धात महाल रायचंदाच्या नारायणीने भरून वाहू लागला. वाहणारी नर्मदा स्थिर झाली. रेवाकुंडाचे पाणी थेंबाथेंबाचे कान करून ऐकू लागले—"यहाँ कहाँ है काज "....**

नर्मदेच्या काठी रूमपतीसाठी नवीन महाल बांधला. नर्मदेचे पवित्र सान्निध्य आपल्या प्रेमाला नित्य साक्ष असावे, नर्मदेच्या निळेचाशार पाण्याने भरलेल्या रेवाकुंडासारखेच आपले प्रेम आकंठ असावे म्हणून.

याच महालाच्या गच्चीत सुहाग रात्रीच्या प्रसन्न चांदण्यात अभिमानाने उभ्या राहिलेल्या बाजवहादुर रूपमतीचे सगळचा मांडूने स्वागत केले. सुखाचे ते दिवस कसे गेले, हे देखील कळले नाही. उल्हास आणि विलासाने भरलेले. तिथे फक्त रूपमती व बाजबहादुर दोघंच राहात. आणि त्यांच्या संगतीला सुरानी भिजलेली गीते, पदन्यासांचे झंकार, सितारीचे मधुर गुंजन. आणि वीणेची न तुटणारी आस...

ते स्वप्न होते का? भूपकल्याण मी इथेच गायले का?

या इथेच तर आपले मीलन झाले. प्रणयाने भरलेल्या दोन हृदयांचे. आणि... आणि जीवनाचे संगीत साकार झाले...

जीवाला जीव देणारे शेकडो सैनिक. चांदण्या रात्री दिसणारे त्यांचे ते भयानक देह. निर्जीव. भेसूर... छावणीतून आदमखां झिंगलेल्या अवस्थेत घोडयावर मांड टाकून मांडूच्या दिशेने भरधाव निघाला. झरोक्यातून पहाणारे डोळे क्षणभर भीतीने मिटले गेले.... आणि उघडले गेले ते काहीतरी कठोर निश्चयानेच.

"त्या सोनेरी दिवसांची आठवण काढून वेळ दवडणे योग्य आहे का?" देहातून जाणीव नष्ट झाल्याप्रमाणे ती येऊन वीणेशेजारी बसली. डोळे बंद करून घेतले. आता क्षुब्ध चेहऱ्यावर शांति पसरली. तिने भगवती रेवा आणि रेवाशंकराचे स्मरण करून अनामिकेतील आंगठी समोर धरून तिच्यातील जहरात बुडविलेला हिरा काढून घेतला आणि काही क्षण प्रेमाने आणि कृतज्ञ दृष्टीने त्या हिऱ्याकडे पहात तत्काल तो हिरा घशाखाली सरकवला.

महालाच्या दरवाज्यावर जोरात थाप पडली. "जिवंतपणीच या दुष्टाचे हात

तिने घाईने दरवाजा उघडला. रायचंद व सुलेमानखाँ दोघेही आत आले. रूपमती आधार घेऊन आसनावर बसली. सुलेमानखाँ दरवाजातून बाहेरील चाहूल घेऊ लागला.

फरशीवर बसता बसता रायचंदाने विचारले, "राणी साहेब, मी काय ऐकतोय् हे? आपण देखील त्या दुष्टाला शरण जाणार?"

"विवशता माणसाकडून सगळं काही करवून घेते सरदार." रूपमतीवर विषाचा अंमल चढू लागला होता. शेजारी असलेल्या तक्क्याला ती टेकली.

"सुलताने आलम बाजबहादुरांच्या अथांग प्रेमाची साक्ष देणारा हा नर्मदेचा प्रवाह हे रेवाकुंड या आदमखांच्या अत्याचाराने गढूळ होणार?"

"राय! कोणतीही आशा राहिली नाही आता. कुणाचा आधार नाही. पुरुष जिथे पांगळे होतात त्या स्थितीत स्त्री विवश होणार नाही तर काय करील ती?" रूपमतीने पाण्याने भरलेले पात्र तोंडाशी नेले. तिचे हात कांपत होते. घसा सुकत चालला होता.

"राणीसाहेब, सुलताने-आलमांच्या मृत्यूविषयी कोणतीच खात्रीलायक बातमी मिळू शकत नाही. मी तर आपणास

वाड्यातील गुप्त मार्गाने घेऊन जाण्या-साठी आलोय्. बाहेर गेल्यानंतर आपण सुलतानांचा शोध घेण्याचा प्रयत्न करू.

"पण राय! तुम्ही फार उशीर केलात. मी आता तुमच्याबरोबर येऊ शकणार नाही." रूपमतीचा आवाज अडखळू लागला होता.

"पण कां? राणी साहेबांचे शील... त्या दुष्टाने..."

"नाही राय. मी राजपुतनी आहे. शीलाचे रक्षण कसे करावे हे...पूर्णपणे जाणते.काही वेळापूर्वी आला असता तर..."

रूपमतीला रक्ताची गुळणी आली. तिने स्वतःला सावरून रायचंदांना शेजारी बोलावले.

"सुलताने आलमनां सांगा रूप शेवटपर्यंत तुमचीच होती. तुमचे नांव घेत घेत तिने देह ठेवला."

रूपमतीचा आवाज क्षीण होत चालला होता. देह काळानिळा पडत चालला होता.





सुलेमानखाँला तिने समोर असलेली वीणा जवळ आणून ठेवण्यास सांगितले व तीं रायचंदाना म्हणाली,

"राय, माझी एक शेवटची इच्छा पुरी कराल?"

"पंचप्राणाची बाजी लावू बोला, आज्ञा व्हावी मलिकाए–आला... काय करू तुमच्यासाठी."

"राय! सुलताने आलम तुम्ही गाय-लेल्या 'नारायणी'ची नेहमी स्तुती करीत. माझ्यासाठी तेवढी 'नारायणी' गाल?"

**अब जिया तुमपे जात है**
**यहाँ कहाँ है काज ॥**

रूपमतीचे कातर नेत्र रायचंदांवर स्थिर झाले.

क्षणार्धात महाल रायचंदांच्या नारा-यणीने भरून वाहू लागला. वाहणारी नर्मदा स्थिर झाली. रेवाकुंडाचे पाणी थेंबाथेंबाचे कान करून ऐकू लागले.

**यहाँ कहाँ है काज ॥**

निःश्वासाची तार तुटत चालली. वासंती चूनरी सांवरणारा रूपमतीचा हात निश्चेष्ट होत अलगद वीणेवर पडला.

हुजूरे-आला, शान्-ए-मुगलिया, वालि-ए-मालवा आदमखाँ धाड्कन् महालाचे दरवाजे उघडून आत घुसला.

रूपमतीच्या सौंदर्याने वेडा झालेला. मुगले आजम् अकबराचीही अवज्ञा कर-ण्यास तयार झालेला.

पण आता त्याला त्या निर्जीव शरीरा-कडे पाहाण्याचाहि धीर होईना. वीणे-वरचा हात त्याला हंसत होता. वस्त्रा-लंकारानी मढवलेला तो संगेमरमर अत्याचार आणि अन्यायाची कुचेष्टा करीत होता. माळव्याचा मान आणि मर्यादाच त्या प्रचंड महालात चारी बाजूने त्याला खायला आल्यासारखी वाटू लागली.

आदमखाँ भेदरलेल्या पावली मागे फिरला. घोड्याचा लगाम त्याच्या हातात होता. परंतु मांड पकड घेत नव्हती. रिकीबीतून पाय गळत होते. रेवाकुंडाच्या किनाऱ्याकिनाऱ्याने घोडा बुडणाऱ्या चंद्राच्या प्रकाशात वाट चालत होता.

रायचंदांची नारायणी संपली नव्हती. अजून संपली नव्हती. महालाच्या रिकाम्या भिंती त्याला साद देत होत्या. आणि रेवाकुंडाचे डुबणारे निः श्वासहि.

**"रूपमती दुखिया भई**
**बिना बहादुर बाज**
**अब जिया तुमपे जात है**
**यहाँ कहाँ है काज ॥धृ॥**

●●●

# 'यत्न तो देव जाणा रे'
## यांचे मूर्तीमंत प्रतीक
## कै. कृष्णराव हणमंतराव कब्बूर



**जवळ** जवळ २० वर्षांपूर्वीची गोष्ट. मी एम्. ए. झालो होतो. पीएच. डी. करिता मार्गदर्शक आणि विषय निवडला होता. नांव नोंदवले होते. कोणी काय उद्योग करतोस म्हणून विचारले, की पीएच्. डी. करतो म्हणून सांगत असे. जाणते लोक हसत आणि नेणते लोक चार दोन मिनिटे चकित होत. कारण बिझिनेस करतो, घरचे बघतो आणि पीएच्. डी. करतो ह्या तिघांचा अर्थ एकच– मी बेकार आहे. मी इकडे तिकडे हिंडत होतो, हातात येतील ती चार पुस्तके वाचत होतो. मी संशोधन करण्याऐवजी माझे मार्गदर्शकच बिचारे सकाळच्या रामप्रहरी आपल्या विद्यार्थ्याचे संशोधन करीत घरी येत. एके दिवशी वडिलांनी मला अडवले आणि विचारले, "पीएच. डी. करिता कोणी तुला दोन वर्षे शिष्यवृत्ति दिली तर तुझी हरकत आहे का ?" वडिलांना वाटले असावे की माझ्या स्वाभिमानाला परक्याचे धन पटणार नाही. कारण आजपर्यन्त माझे शिक्षण कोणाचीही दिडकी न घेता स्वावलंबनावर (अर्थात वडिलांच्या) झाले होते. हुशार विद्यार्थी म्हणून माझ्यावर कोणीच आळ घेतला नव्हता ! मी काहीच न बोलता उभा राहिलो. मौन हेच आमच्या संमतीचे लक्षण समजून तीर्थरूपांनी मला दुसरे दिवशी सकाळी रंगाचे प्रख्यात कारखानदार कृष्णराव हणमंतराव कब्बूर यांच्यासमोर उभे केले.

पुढे जवळ जवळ चार वर्षे मी कब्बूरसाहेबांच्या समोर उभाच होतो, शरीराने नव्हे, मनाने ! साहेबांच्या सहवासात येणाऱ्या प्रत्येक माणसाची माझ्यासारखीच स्थिति होत असे ! 'सामर्थ्य आहे चळवळीचे' ह्या रामदासांच्या वचनाची सार्थता ह्या लांबीने आणि रुंदीने लहानसर असणाऱ्या मूर्तीवरून येत असे. स्वास्थ्य आणि आळस ह्या अर्थाच्या एकूण एक सर्व शब्दांना कब्बूरसाहेबांच्या शब्दकोशामधून गचांडी मिळाली होती ! घरातली सर्वच माणसे – नातलग आणि नोकर – नेहमी एका पायावर उभी असत ! दुसरा पाय आपला उचललेला असे ! केव्हा साहेब हाक मारतील, केव्हा टाळ्या वाजवतील, अकस्मात् केव्हा उठून येतील, यासंबंधी ठोकताळे बसविणे हे अशक्य होते. जीभ तितकीच तिखट ! भीडभाड, भेदभाव काही नाही ! अंगचुकारपणा केला, चूक झाली असा संशय आला, की त्या माणसाचे मरण ओढवलेच म्हणून समजावे ! जे घरी तेच दारी – ऑफिसमध्ये ! एरवी चिमण्याप्रमाणे चिवचिवणारे ऑफिस साहेब आले की तोंड मिटून भरभरा काम करायला लागे ! एका मोठ्या दिवाणखान्यात कब्बूरांचे ऑफिस होते ! सगळा उघडा कारभार. मालकालासुद्धा आडपडदा नाही. साहेबांची करडी नजर सगळीकडे फिरत असे. नशिबाने एक वर्ष साहेब आणि बाईसाहेब युरोप आणि अमेरिकेच्या दौऱ्यावर गेले. ताबडतोब मॅनेजरनी खोल्याच खोल्या तयार केल्या ! साहेबांची खोली वेगळी, मॅनेजरची वेगळी, हिशोबनीसाची वेगळी–साहेब आल्यावर थोडे गुरगुरले पण रोजची नजरकैद वाचली.

**योगायोगाने एका जर्मन तज्ञाच्या हाती हा बिनपैलूंचा हिरा सांपडला. त्याने त्याची घडणजडण केली. त्यातूनच रंग-व्यवसायाकडे भारतीय उद्योगपति आकर्षित झाले. पण त्यासाठी कै. कब्बूर यांचे जीवन जाणणे अगत्याचे आहे.**

अशा महापुरुषाच्या छत्राखाली मी चार वर्षे काढली ! साहेबांनी सुरवातीलाच मला सांगितले, "हे पहा सर्वसाधारण माणूस रोज आठ तास काम करतो, तुझ्याकडून मी आठवड्यातून आठ तास कामाची अपेक्षा करतो ! काम म्हणजे मराठीचा व इतर पुस्तकांचा परिचय करून देणे ! वृत्तपत्रांतील महत्वाच्या लेखांचा गोषवारा तयार करणे, महत्वाच्या घटनांची माहिती देणे, प्रसंगी मराठी-

● परिचायक : –म. मा. आळतेकर










अनुक्रमणिका

मधून पण मुख्यतः इंग्रजीमधून भाषणे लिहिणे. थोडक्यात म्हणजे कव्हूरसाहेबांची सांस्कृतिक की काय म्हणतात ती आघाडी सांभाळणे ! त्यासाठी आठवड्यामधून तीन दिवस रात्री मला किंग्जसर्कलला त्यांचे घरी जावे लागे! अगोदर फिरण्याचा कार्यक्रम असे. साहेबांबरोबर मलाही व्यायाम घडे आणि फिरताना अनेक लहान मोठ्या व्यक्तींचे दर्शन घडे ! व्यक्ति दृष्टीआड झाली की साहेबांचे कधी गंमतीदार तर कधी खेळकर भाष्य त्या व्यक्तीबद्दल ऐकावयास मिळे. साहेब घरातल्या सर्व मंडळींसमवेत जेवावयास बसत. ज्ञानेश्वरांनी वर्णन केल्याप्रमाणे "एकलिया वरलीया एकची" पक्वान्ने असत. जेवताना व वाढताना कसलाही भेदभाव नसे. घर सुंदर आणि सोइस्कर कसे असावे ह्याचा उत्तम नमुना म्हणजे साहेबांचा 'किरण' बंगला ! आणि त्यात परत देशी पद्धतीने बांधलेले व सगळीकडून उघडे असलेले! फुलांच्या सुगंधानी भरलेले जेवणघर! परिवारावरोवरच रोज रात्री जेवावयास चार दोन पाहुणे हे असावयाचेच ! भोजनास प्रारंभ प्रार्थनेने व्हावयाचा. वदनी कवळ घेताना, श्रीहरीचे नाम हे हटकून यायचेच! यामुळे एकंदर वातावरण जितके प्रसन्न तितकेच पवित्र असे! खरोखर असे आदर्श भोजन मी परत कुठेच पाहिले नाही आणि चाखलेही पण नाही! जेवणाचा बेत साधाच पण स्वादिष्ट असावयाचा ! मेथीची भाजी आणि वांग्याची भाजी ह्या दोन भाज्या म्हणजे साहेबांचा जीव की प्राण! ह्यापैकी एखादी भाजी दिसली नाही की साहेब एखाद्या लाडावलेल्या लहान मुलाप्रमाणे आकांडतांडव करीत! अशा समयी इतरांच्या समवेत माझ्या तोंडाची उघडझाप चालू असे पण त्यांची खाण्यासाठी असे तर माझी बोलण्यासाठी! आपल्या बरोबरच इतरांनाही माझ्या विद्वत्तेचा अमोल लाभ व्हावा, ते बहुश्रुत व्हावेत म्हणून आमचे पुराण म्हणा, प्रवचन म्हणा किंवा भाषण म्हणा हे भोजनसमयी ठेवलेले असे. बोलताना मध्येच साहेब मला काही प्रश्न विचारीत आणि कधी कधी त्याची आपणच सविस्तर उत्तरे देत. साहेब कॉलेजमध्ये जाऊन चार पुस्तके शिकले नसले तरी त्यांचे वाचन चौरस होते ! वेळ मिळेल तेव्हा हातात पेन्सील घेत, पानावर खुणा करीत. साहेब पुस्तकामागून पुस्तकांचा फडशा पाडीत! अक्षराला जेव्हा अनुभवाची जोड मिळते तेव्हा त्याची गोडी अवीट असते. सहज बोलता बोलता साहेब एखादे वेधक वाक्य आपल्या कानडी हेलात बोलून जात! 'काटकसर ही केव्हाही चांगली. पण काटकसर ही मोलकरीण आहे, मालकीण नाही,' 'निग्रह आणि प्रामाणिकपणा ह्यासारखे शाश्वत गुण नाहीत! आपल्याला ते शेवटी भरपूर फायदा देतात.' "आई कशीही असली तरी ती आपली आई आहे, तिला मानानेच वागवले पाहिजे" एक ना दोन अशी कितीतरी वाक्ये आठवतात. मराठी आणि त्यात पुन्हा पुणेरी माणूस हा अल्पसंतुष्ट आणि अहंकारी असतो, असे कव्हूरसाहेबांचे आवडते मत होते. "दहा हजार रुपये मिळविले की आपण कुबेराचे बाप आहोत असे त्याला वाटते. तो रावसाहेब होतो. रोज केळ्याची शिकरण, पोळी आणि बटाट्याची भाजी खाणे म्हणजे श्रीमंत होणे अशी त्याची प्रांजळ कल्पना असते" साहेब हसत हसत वाभाडे काढीत.

एखादे भाषण, एखादा लेख किंवा एखादे टिपण तयार करायचा प्रसंग आला, की तुकोबाप्रमाणे 'आपुले मरण पाहिले म्यां डोळां' असे म्हणायची पाळी येई ! पहिला खर्डा, दुसरा खर्डा, तिसरा खर्डा, असे कितीतरी खर्डे होत! कागदांचे ढीग पडत पण साहेबांचे समाधान होत नसे! मधेच एखादा नवीन मुद्दा सुचे आणि परत आवर्तनाना सुरुवात होई. १९४७–४८ साल असेल! नक्की आता आठवत नाही. विजापूरला डॉक्टरांची परिषद होती व त्याचे उद्घाटन कव्हूरसाहेब करणार होते. भाषण फार मोठे नव्हते. पण लहानही नव्हते. शेवटचे दोन दिवस आमचा मुक्काम 'किरण' बंगल्यावरच होता. भाषण घासून पुसून अगदी लख्ख तयार झाले होते! 'विजापूरला येतोस का? एक तिकीट अधिक आहे! चार दिवस मजेत जातील! गोलघुमट बघायला मिळेल.' साहेबांनी आमच्या पुढे गोल घुमटाचे गाजर धरले! पण भाषण लिहिताना दोन दिवस कसे गेले हे ठाऊक असल्यामुळे आम्ही चार दिवसांचा तो मोह निग्रहाने टाळला. कारण गाडीत साहेबाना एखादा नवीन मुद्दा सुचला असता, आणि आमचे 'पुनरपि मरणम' सुरू झाले असते! साहेबांच्या सारखा अहोरात्र काम करणारा आणि इतरांच्याकडून तसेच काम करून घेणारा माणूस मी दुसरा पाहिला नाही. 'केल्याने होत आहे रे आधी केलेच पाहिजे' आणि 'यत्न तो देव जाणावा' ह्या रामदासांच्या खड्या बोलावर कव्हूरसाहेबांचा पूर्ण विश्वास होता. पण प्रत्येक प्रयत्न हा पद्धतशीरपणे केला पाहिजे यावरहि त्यांचा कटाक्ष होता. 'उंदराच्या शिकारीला सिंहाच्या शिकारीची तयारी' म्हणतात तसा प्रकार साहेबांचा असे! एकदा आम्ही कधी नाही ते लोणावळ्याला आणि कार्ल्याला सहलीस गेलो! पण पांचसहा दिवस








पूर्वतयारीचा आणि वेळापत्रकाचा इतका गदारोळ माजला होता, की एखाद्याला वाटावे की आम्ही मंगळावर किंवा चंद्रावरच निघालो आहोत. किती वाजता निघायचे, किती वाजता परत यायचे, कोणाकोणाला बरोबर घ्यायचे, कोणी कोणत्या मोटारीत आणि कोणत्या जागी बसायचे, खाण्यासाठी कोणते पदार्थ तयार करावयाचे ह्या सर्वांवर चारदोन टिपणे तरी तयार व्हावयाचीच. त्यात पुढे कणभर जरी फरक पडला तरी साहेबांचे पित्त खवळे! जो समोर सांपडेल त्याची यथास्थित खरडपट्टी निघे! विषाप्रमाणेच गुणांचाही उतारा असावा लागतो. नाहीतर गुणसुद्धा असह्य होतात. माणसाने उद्योगमग्न असावे हे खरे पण मधून मधून मनाला व शरीराला विसावा हा मिळालाच पाहिजे. निग्रह चांगला खरा पण प्रसंगी मुरड घालण्याइतका लवचिकपणा माणसात असलाच पाहिजे. कित्येक वेळा गुण हे सिंदवादच्या मानगुटीवर बसणाऱ्या म्हाताऱ्याप्रमाणे एखाद्याला सतावतात. साहेबांच्या मानगुटीवर त्याचे काही लोकोत्तर गुण बसत असत. आयुष्यात काहीतरी ध्येय, काहीतरी हेतु असावा हा कव्बूरसाहेबांचा आग्रह असे. योजना नसेल तर आपले प्रयत्न फसतात. "वडील लवकर मरण पावल्यामुळे आपली वाढ कशीतरी वेडीवाकडी झाली. त्यामुळे वरेच वळ कारण नसताना फुकट गेले. कारण नसताना कितीतरी अडचणींना तोंड द्यावे लागले!!" कव्बूर पुन्हा पुन्हा सांगत. त्यात काहीच खोटे नव्हते. पण हेतु स्तुत्य असला तरी त्याची वाजवीपेक्षा अधिक जाणीव नसावी. कव्बूरसाहेबांजवळ ती नेणिवेची किमया नव्हती.

कव्बूरसाहेबांचे चरित्र किर्लोस्कर किंवा तत्सम मासिकात यावे (कदाचित केव्हातरी येऊन गेलेही असेल) असे उद्योग, उत्साह आणि उन्नति यांनी भरलेले आहे. 'कंपौंडरचा कोटयाधीश कसा झाला' असा मथळा त्यांच्या चरित्रपर लेखाला चपखल बसेल.



—"काय म्हणता, 'याना' मोटारचा अपघात झाला की आपल्याला २०,००० रु. मिळतात ?

घरची गरिबी त्यामुळे वेळगावला वार लावून शिक्षण. शिक्षण घेत असतानाच केळकर नांवाच्या एका डॉक्टरांकडे कंपौंडरची नोकरी. मासिक पगार चार रुपये! पुढे अंगच्या हुशारीमुळे हा पगार आठ रुपये झाला. घरची अशी एकादशी असताना देशाभिमानाची ज्योत ह्या लहान मुलाच्या अंतःकरणात तेवत होती. त्यामुळे बाँब तयार करण्याचे रासायनिक रहस्य कळावे, म्हणून पुढील शिक्षणासाठी हा शाळकरी मुलगा मुंबईला आला. सर्कसवाल्या धोंडोपंत छत्र्यांच्या वशिल्यामुळे ऑस्टर मेयर्स प्रयोगशाळेत प्रवेश मिळाला. ह्या मुलाचे शिक्षण मॅट्रिकपर्यन्त झालेले असले तरी त्याचे वाचन जबरदस्त व विशेष म्हणजे स्मरणशक्ति एकपाठी. १९०७ साली कव्बूरना आदमजी पीरभॉय मिलमध्ये प्रवेश मिळाला. ह्याच गिरणीत पुशमन हा जर्मन तंत्रज्ञ खातेप्रमुख होता. कव्बूरांचे नशीव उघडले. ह्या मुलाची जिज्ञासा, अविरत उद्योग, हुशारी आणि प्रांजळपणा पाहून पुशमन साहेबाची मर्जी बसली. ह्या साहेबाने आपल्याजवळची विद्या मुक्तहस्ताने कव्बूरना दिली. शिष्यही तितकाच भला असल्यामुळे त्यानी ती पूर्णपणे पचविली.

याच वेळी पातळे कशी छापावीत, याचे धंद्याच्या दृष्टीने संशोधन चालू होते. गिरणीच्या मालकाने त्यासाठी जर्मनीमधून खास एक संशोधक मोठा पगार देऊन आणला. पुशमनने कव्बूरला विचारले, 'तुला हे जमेल का?' 'प्रयत्न करतो' शिष्याने उत्तर दिले. काही दिवसानी कव्बूरांनी आपल्या प्रयोगाचे फळ गुरुपुढे ठेवले! बोलावलेला संशोधक, काही जमत नाही, म्हणून केव्हाच निघून गेला होता. कव्बूरांचा हा प्रयोग पुशमनने मोठ्या अभिमानाने व कौतुकाने मालकाना दाखविला. त्यानी तो स्वीकारला. त्यामुळे त्याचे हजारो रुपये वांचणार होते, हजारो रुपये मिळणार होते. हे साधावे म्हणून जर्मन माणसावर त्याने हजारो रुपये खर्च केला होता. पण कव्बूराना मात्र ही स्वारी उदारपणे ५० रुपयांचे प्रचंड पारितोषिक देण्यास—आणि तेसुद्धा पुशमनने आग्रहच धरला म्हणून—तयार झाली!

कव्बूरांचे श्रम वाया गेले नाहीत. मालकाला कळली नाही, पण पुशमनला ह्या नोकराची योग्यता कळली होती आणि त्यामुळे १९०९ साली कव्बूरला पुढील शिक्षण मिळावे म्हणून हा साहेब जर्मनीला बरोबर घेऊन गेला. काही वर्षे कारखान्यात काम केल्यावर कव्बूर स्वदेशी परत आले व मुंबईला सुरजी प्रागजी नांवाच्या रंगाच्या व्यापाऱ्याकडे नोकरीला राहिले. प्रारंभी पगार ३०० रुपये होता लौकरच तो २५० रुपयानी वाढला! मुंबई, मद्रास आणि मदुरा ह्या शहरांमधून कव्बूरांचा संचार असे!

१३ डिसेंबर १९१३ मध्ये विजापूरच्या अंकळीकर ह्या प्रतिष्ठित घराण्यातील सोनूताई नांवाच्या ११ वर्षाच्या मुलीबरोबर कव्बूरांचे लग्न झाले! सोनूताई म्हणजे साक्षात् लक्ष्मीच कव्बूरांच्या घरी आली. नवऱ्या मुलीच्या भावाचा माधवरावांचा व



अनुक्रमणिका

कव्बूरांचा मुंबईसच परिचय झाला होता. माधवराव त्यावेळी विल्सन कॉलेजमध्ये शिकत व वसतिगृहात राहात! वसतिगृहातील वल्लवाचार्यांचा हात फारच स्वादिष्ट होता. त्यामुळे त्याच्या पाककौशल्याला दाद घ्यायला कव्बूर अनेकदा हजेरी लावीत.

कव्बूरांच्या घरात आलेल्या सूनवाई ह्या मोठ्या पायगुणाच्या होत्या. नांव सोनूबाई आणि हाती कथलाचा वाळा ही म्हण त्यानी खोटी पाडली होती. लग्नानंतर लौकरच कव्बूरांनी नोकरी सोडली आणि स्वतंत्र धंदा करण्यासाठी परत विलायतेला गेले. हांतरूण पाहून हातपाय पसरणारा हा तरुण नव्हता. मारुतीप्रमाणे साक्षात् सूर्याला ग्रासण्याची त्याची महत्वाकांक्षा होती. थोड्याच काळात त्याने हातात कसलेही भांडवल नसताना उद्योग व सचोटीच्या वळावर आपल्या व्यापाऱ्याचा जगभर पसारा वाढवला.

उत्तम पोशाख, उत्तम हॉटेल, उत्तम भोजन—कव्बूरांना प्रत्येक गोष्ट उत्तम लागे. हात सढळ आणि माणसे जोडणारे असल्यामुळे थोड्याच काळात विविध क्षेत्रांतील व्यक्तींचे त्यानी आपल्याभोवती एक वर्तुळ निर्माण केले. १९१९ मध्ये कव्बूरसाहेवानी सोनूताईना. आपल्या मातोश्री अव्वा यांना इंग्लंडमध्ये बोलावून घेतले. कृतज्ञता हा कव्बूरांचा एक मोठा गुण! आप्ताना आणि ज्यांनी बाळपणी आणि तरुणपणी मदत केली, अशा अनेकाना ह्याच काळात कव्बूरानी जवळ केले. मिळाले त्याच्या कितीतरी पटीने परत दिले.




कोणत्याहि धंद्यात दिवाळी असते तशीच होळीही असते. १९२२-मध्ये कव्बूरांना रंगाच्या व्यापाऱ्यात जबरदस्त फटका बसला. काही काळ कव्बूर कंपनी पार कोलमडली. सगळे गेले. पण कव्बूरांचा धीर सुटला नाही. १९२३ मध्ये परत उद्योगाला प्रारंभ केला. १९२५ मध्ये कव्बूर हिंदुस्थानात परतले व मुंबईला मुक्काम करून व्यापार वाढविण्याला सुरुवात केली. आणि गेल्या महायुद्धात गेलेले सर्व मिळविलेच व त्यावर कितीतरी पटीनी त्यानी अधिक कमवले. उंबरठा ओलांडून बाहेर पडलेल्या लक्ष्मीला परत ठाणबंद करणे हे कार्य सामान्य नाही. त्याला मोठ्या धीराचा, उद्योगाचा व जिद्दीचा माणूस लागतो.

कव्बूरसाहेवांना मी पाहिले, ते दुसऱ्या महायुद्धाच्या शेवटी शेवटी! वयोमानाप्रमाणे पान पिकून पिवळे होऊ लागले होते पण मूळचा हिरवटपणा बराच कायम होता. कव्बूर नांवाचे एक श्रीमंत आणि उदार उद्योगपति आहेत, ह्याचा बोभाटा सर्वत्र झाला होता. त्यामुळे लहानमोठे शेकडो याचक रोज सकाळ-संध्याकाळ एकच गर्दी करीत! त्याना तोंड देता देता पुरेवाट होई. अनेकांच्या अनेक योजना असत. काही योजना खरोखरीच चांगल्या असत. काही विक्षिप्त असत आणि काही मोठ्या धूर्त असत. पात्रापात्र विचार करण्यात कव्बूरांचा बराच वेळ जाई. काही लोक नवीन कारखाने, नवीन उद्योग सुरू करावेत म्हणून येत. साहेबांच्यासारखा बारा गांवचेच नव्हे तर बारा देशांचे पाणी प्यालेला माणूससुद्धा कधी कधी फसत असे. अशावेळी जे समोर चालले असेल ते बघत बसणे व ऐकत बसणे हे एक मोठे शिक्षणच होते. साहेब प्रश्न कसे विचारतात, मूळ मुद्याला बगल देऊन उत्तरे कशी देतात, काही लोकाना साफ उडवून कसे देतात हे बघण्यात मोठी मजा असे.

साहेब वृत्तीने धार्मिक आणि श्रद्धाळू असल्यामुळे कीर्तनकार, प्रवचनकार, देवळांचे चालक, वेदोपनिषदांचे व पुराणांचे अभ्यासक ह्यांचीही सतत वर्दळ असे. ह्या प्रत्येकाला थोडे थोडे द्यावयाचे म्हटले तरी दहा कुबेरांचे दिवाळे वाजले असते. मग कव्बूर कोट्याधीश असले, तरी काय करणार ?

कव्बूरसाहेबांचा पाहुणचार हा प्रख्यात होता. सगळ्या दानात अन्नदानावर साहेबांची अधिक श्रद्धा होती. काही याचक रिकाम्या हाताने जातील पण सहसा रिकाम्या तोंडाने जाणार नाहीत! पण ह्या पाहुणचारातही काही गंमती असत. साहेबांच्या व बाईसाहेबांच्या सहवासात सतत असल्यामुळे त्या मला दिसत! कोणी पाहुणा आला की 'काय घेणार' हा साहेबांचा पहिला प्रश्न असे. 'चहा घेणार का, कॉफी घेणार का कोल्ड ड्रिंक–लेमन, ऑरेन्ज काही घेणार? कव्बूरसाहेब पदार्थामागून पदार्थ विचारीत. आलेला माणूस बिचारा बावरून जाई. काय मागावे ते त्याला सुचतच नसे. परत एवढ्या मोठ्या माणसाला मला अमुक अमुक पाहिजे हे म्हणणेही थोडे गैरशिस्तच ! साहेबांच्याकडे कोठल्या-

अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




तरी सरबताची एक बाटली होती. पाहुणा गोंधळलेला बघून साहेब म्हणत, अमुक तमुक सरबत आहे. फार छान आहे. काय. आणि दुसऱ्या मिनिटाला सरबताचा पेला समोर येई. साहेबांच्या मनात अशावेळी सरबतच देण्याचे असे. चहा, कॉफी, ऑरेन्ज हे सर्व 'डमी' उमेदवार असत. पण साहेब पाहुण्याला आपल्या बोलण्याने प्रथम गार करीत आणि नंतर सरबताने

साहेब जितके आग्रही आणि निग्रही होते तितकेच उतावळेही होते. कोणतीही गोष्ट निमिषार्धात झाली पाहिजे, हा साहेबांचा आग्रह असे. त्यामुळे कधीकधी फार गंमती होत. एकदा साहेबांचे एक बाळपणचे जिवलग मित्र सहकुटुंब सहपरिवार भेटायला-रहायला आले होते. श्रीकृष्णाकडे सुदाम्याने यावे असाच काहीसा प्रकार होता. सगळ्या कुटुंबाची प्रकृति सुमारच होती. आठ दिवसात तुम्हाला पहिल्यासारखे ठणठणीत करतो असे, ह्या मनाने व धनाने श्रीमंत असणाऱ्या बाळमित्राने आश्वासन दिले. सर्व प्रकारच्या पौष्टिक पदार्थांचा एकदम मारा सुरू झाला. दुसरा दिवस उजाडला आणि सकाळी कव्हूरांनी सगळ्यांना वजनाच्या काट्यावर उभे केले. किती वजन वाढले ते बघण्यासाठी ! हा कार्यक्रम पंधरा दिवस रोज चालू होता. बी लावले रे लावले, की दुसऱ्या दिवशी त्याचे काय झाले हे जमीन उकरून जशी लहान मुले पहातात, तोच उत्साह आणि उतावळेपणा येथे होता.

जसा उतावळेपणा तसाच मनाचा चंचलपणा. विलायतेला व अमेरिकेला जाण्यावेळचीच मजा ! विमानाचे निदान दहा वेळा तरी तिकीट मॅनेजरानी काढले असेल. व तितक्याच वेळा परतही केले असेल. कारण साहेबांचा बेत बदले. शेवटी विमानाचे लोक ह्या धरसोडीस कंटाळले व मॅनेजरचा उद्धार करू लागले. मॅनेजरची स्थिती दोन्ही बाजूंनी थपडा खाणाऱ्या मृदुंगासारखी झाली. विमानाच्या अधिकाऱ्यांना बोलावे तर साहेब कुठले कोण. बरे कव्हूरांना काही सांगावे तर ते गुरगुरणार, "दहा टक्के पैसा गेला तर तो माझा जाईल–तुझ्या तीर्थरूपांचा तर जात नाही ना" यावर मॅनेजर काय कपाळ बोलणार ?

कव्हूरसाहेबांच्या जिभेवर जसा कधी कधी हिरव्या मिरच्यांचा ठेचा असे तसेच अनेकदा जिभेवर मधाचे मोहोळही असे. अशावेळी 'प्लीज' हा शब्द साहेबांच्या संभाषणात पालुपदाप्रमाणे येई. समोरच्या माणसाच्या मनाचे पापुद्रे हळुवार नजरेने साहेब बघू शकत असत. त्या माणसाच्या सुखदुःखाशी ते सहज समरस होत. साहेबांनी एवढा प्रचंड व्यापार कसा केला व मोठा लोकसंग्रह कसा केला ह्याची कल्पना अशावेळी येई. कधी कधी आपल्या सहधर्मचारिणीबरोबर अधिक आपुलकीने वागले पाहिजे, असे साहेबांना वाटे. आणि मग वयाने प्रौढ पण वृत्तीने तरुण असणाऱ्या ह्या दंपतीचे वागणे आणि बोलणे अगदी दृष्ट लागण्यासारखे असे.

शेवटी शेवटी आमचाही मॅनेजर होण्याची वेळ आली. १९५०-५१ च्या सुमाराला कव्हूरसाहेबानी पंधरा लाख रुपयांचा शैक्षणिक निधी उभारला. न्यायमूर्ति गजेंद्रगडकर, न्यायमूर्ति लोकूर, डॉ. धायगुडे, अशी काही मोठी माणसे विश्वस्त मंडळात होती. आपला हाताशी होतो, म्हणून साहेबानी मला, कार्यवाह म्हणा उपकार्यवाह म्हणा, नेमले. जोडीला मानधनही होते. मान आणि धन दोन्हीही. असा पंधरा लाख रुपयांचा निधी आहे, हे कळल्याबरोबर विद्यार्थ्यांची, त्यांच्या पालकांची व शिक्षण संस्थांची एकच गर्दी उसळली. शंकराच्या अगोदर नंदी या न्यायाने प्रत्येकजण माझ्याशी आदराने व नम्रपणाने बोलू लागले, आणि घरी वेळी अवेळी येऊन सतावू लागले. हे मानाचे घी आम्ही पाहिले पण लौकरच साहेबांचा बडगाही बघितला. निधीची सुरुवातच असल्यामुळे अशा प्रकारची अनेक निधीची माहिती व त्याचे वेगवेगळे फॉर्म्स आम्ही गोळा केले. त्यावरून आम्ही आपले कागद तयार करणार होतो. साहेबांना कुठलाच नमुना पसंत पडेना. शेवटी कपिलाषष्ठीचा योग का काय म्हणतात तो आला, आणि फॉर्म्स छापण्याची मला परवानगी मिळाली. छापखाना काय घरचाच होता म्हणून तसाच उठलो आणि छापखान्यात गेलो. पण आमच्या अगोदर साहेबांचा टेलिफोन आला होता. 'येतील ते फॉर्म छापू नका, आणखी थोडा विचार करावयाचा आहे,' असे दोनचारदा झाले. एक दिवस आमचा धीर सुटला आणि आम्ही ह्या निधीस राम राम ठोकला.

सगळ्या जगाला, कव्हूर दांपत्य हे साहेब आणि बाईसाहेब, म्हणून माहीत होते. पण घरात मात्र मामा आणि मामी म्हणूनच त्याना संबोधित. अनेक भाच्या आणि अनेक भाचे कव्हूरांच्याकडे नेहमी असत. एकदोन प्राथमिक शाळेत, दोनतीन इंग्रजी शाळेत व दहाएक कॉलेजात अशी वाटणी असे. सर्वांचे शिक्षण खाते, भोजन खाते, आरोग्य खाते, पुरवठा खाते ह्याची जबाबदारी मामा आणि मामी सांभाळीत. २० वर्षांपूर्वी लहान असणारी भाचरे आता ओळखता येत नाहीत. एखाद्या भाचीकडे बघावे तर ती आता एक दोन मुलांची आई झालेली असते व आपल्या प्रेमळ मामीकडे माहेरपणाला आलेली असते. एखादा भाचा बघावा तर तो एस. के. कव्हूर कंपनीत एखाद्या मोठ्या अधिकारपदावर असतो. काळ जसा पुढच्या दरवाजाने जातो, व मागल्या दाराने परत येतो त्याप्रमाणे ही भाचेमंडळी करतात की काय, असा मला संशय येतो. कारण आजच्या घटकेला गेले तरी शाळेत आणि कॉलेजात मुलापर्यंन्त घट नाही. बहुधा मागल्या भाच्याचे भाचे आता आले असावेत. कसेही असले तरी 'सालाबाद' प्रमाणे कार्यक्रम चालू आहे. आपल्याला मूलबाळ नसताना इतक्या मुलांचे संगोपन आणि शिक्षण करायचे, म्हणजे उदारपणा सोडा पण सहनशक्ति किती घाऊक प्रमाणात लागत असेल, ह्याची कल्पनाच करवत नाही. कधी आईसाहेबांना भेटायला गेलो की एखादा प्रौढ वयाचा भाचा आणि भाची पुढे येते व ओळखलेत का ? 'वीस वर्षांपूर्वी तुम्ही येत होता मामाना व मामीना काहीतरी वाचून दाखवत होता' असे बोलून मला चांगलेच पेचात टाकते. काही पंख फुटलेले व कव्हूरांच्या घरामधून बाहेर पडलेले भाचे कधी बसमध्ये तर कधी उपहारगृहात तर

कधी रस्त्यात भेटतात. मागच्या आठवणी निघतात. चहाच्या पेल्यात कृतज्ञतेचे चारदोन थेंब मिसळतात आणि आम्ही निरोप घेऊन आपापला व्यवसाय करण्यास पुन्हा सुरुवात करतो.

साहेबांच्या घरात सगळ्या प्रकारच्या सुखसोयी होत्या. प्रशस्त खोल्या होत्या, विविध प्रकारचे फर्निचर होते, खोली खोलीमधून पंखे होते पण एक गोष्ट कधीच नव्हती. हवा थंड करण्याचे किंवा नियंत्रण करण्याचे यंत्र नव्हते. एकदा सहज बोलता बोलता मी साहेबाना विचारले, हे यंत्र तुमच्याकडे कसे नाही? साहेब म्हणाले, मी मुद्दामच घेतले नाही. आपण ज्या प्रदेशात राहातो तेथील नैसर्गिक हवामानाची आपल्याला संवय पाहिजे. पावसात आणि उन्हाळ्यात आपल्याला राहाता आले पाहिजे. असले परावलंबन मला पसंत नाही. साहेब पैशाने व प्रतिष्ठेने खूप मोठे झाले. पण ज्या परिस्थिती-मधून ते वर आले त्यातील एकही गोष्ट ते विसरले नाहीत. आठ-वणींच्या व जाणिवेच्या खिडक्या आणि दरवाजे बंद करून पोकळ डौलाचे व वेगहीत हवा निर्माण करणारे यंत्र त्यांनी जवळ केले नाही. सर्वसामान्य माणसाशी असणारा त्यांचा संबंध कधीही सुटला नाही. अंतःकरणात कुठेतरी अगदी खोल पन्नास वर्षापूर्वी महिन्याला पांच रुपये कमावणाऱ्या आणि शिक्षणासाठी वारावर जेवणारा मुलगा कायम होता.

साहेबांचे वडील फारच लौकर गेले, त्यांच्या मातोश्री—अव्वा ह्या अनेक वर्षे होत्या. आपल्या मुलाचे कर्तृत्व व वैभव त्यानी डोळे भरून पाहिले पण तरीसुद्धा मातापित्याची आठवण त्याना मधूनमधून व्यथित करी, क्वचित काळी अस्वस्थ करी. घरी आलेल्या नवीन माणसाशी किंवा पाहुण्यासही माझी ओळख करून देताना साहेब एका गोष्टीचा आवर्जून उल्लेख करीत, "हा मोठा सुदैवी आहे, ह्याची आजी आहे, आई आहे, वडील आहेत." कधी कधी मला हंसू येई. त्यावेळी साहेब म्हणत, "आईबाप म्हणजे काय ह्याची आज त्याला कल्पना नाही. जे असते त्याची माणसाला किंमत कळत नाही. जो रोज बुंदीचा लाडू खातो त्याला त्याचे महत्व कसे कळणार?" साहेब गेले आणि त्यानंतर काही वर्षांनी माझे मोठे सुदैवहि गेले. कधी कधी साहेबाचे उद्गार अकस्मात् आठवतात पण आता हसू येत नाही. साहेबांच्या शब्दांचा अर्थ आता कळतो पण आता कोणीच नाही !!

कन्नूरसाहेबाना मृत्यु आला तो अकस्मात् आला. ६ फेब्रुवारी १९५६ रोजी बोलता बोलता आणि बघता बघता साहेबांचा प्राण गेला. तसे चार पांच दिवस साहेब आजारी होते. ताप वगरे काही नव्हता. रोज सकाळी साहेब मर्दन करून घेत. मर्दन चालू असताना काही क्षण साहेबाच्या घशात चमत्कारिक घरघर सुरू झाली. सबंध चेहरा लालबुंद झाला. मर्दन करणारा माणूस घाबरला. साहेब म्हणत होते मर्दन कर, पण त्याने नाकारले आणि डॉक्टराना फोन करून बोलावले. डॉक्टरानी काही दिवस घरातल्या घरात रहा, अगदी पडून रहा, हालचाल करू नका म्हणून सांगितले. दुपारपर्यंत साहेब पडून होते पण दुपारी पोषाख चढवला आणि सर्वजण नको नको म्हणत असताना बाईसाहेबाना बरोबर घेऊन बाहेर पडले. मुख्य म्हणजे बँकेत गेले. मॅनेजरशी बाईसाहेबांचा परिचय करून दिला. सेफ डिपॉझिट व्हॉल्ट कसा उघडायचा, कसा बंद करायचा हे प्रत्यक्ष दाखविले. महत्वाच्या कागदपत्रांची माहिती करून दिली. दोघे घरी परत आले. कपडे बदलले व बाईसाहेबाना म्हणाले मला भूक लागली आहे. साहेबाचे आवडते पदार्थ दहीभात आणि वांग्याची भाजी घेऊन बाईसाहेब वर आल्या आणि त्याचवेळी फोन आल्या-मुळे परत खाली हॉलमध्ये आल्या. अगदी त्या क्षणालाच मृत्यूने साहेबांच्यावर झडप घातली. सकाळप्रमाणे घशात घरघर सुरू झाली, जवळ उभी असलेली मुले घाबरली आणि त्यानी मामी-मामी म्हणून हाका मारल्या: बाईसाहेब धावत आल्या—पण अगोदरच प्राण गेला होता, फक्त देह उरला होता. मृत्यूच्या कभिन्न छायेतसुद्धा साहेबांचा स्वभाव बदलला नाही. महाप्रस्थानास प्रारंभ करण्यापूर्वी . . . . . साहेबानी पद्धतशीरपणे सर्व व्यवहार समजावून सांगि-तले. जरूर त्या माणसांचा परिचय करून दिला, घरी परत आले आणि शेवटी मृत्यूला जणू काय म्हणाले, "बाबा रे मी तयार आहे. आता खुशाल ये."

●●●

# शेवटी बातमी मिळते......



—गोपाळ गोरवाडकर

**वीणा घेऊन नारायण ऽऽ नारायण करीत त्रिलोकी संचार करणाऱ्या 'आद्य-पत्रकार' श्रीनारदांचा हा वंशज, तंग पँट, कपाळावर केसाची किंचित झुलपे, डोळ्याला काळा चष्मा, बुशशर्टच्या खिशात पेन नि पँटच्या खिशामधे टिपणी घेऊन बातमी बातमी असे स्वगत बडबडत गल्ली-बोळांपासून तो मंत्री प्रासादापर्यंत वेळी अवेळी सांजसकाळी भटकंती करू लागला......**

**'स्टाफ** रिपोर्टर'च्या इंटरव्ह्यूसाठी जेव्हा मी दै. देशवाणी कार्यालयाच्या पायऱ्या चढलो, तेव्हा मनातून मी काहीसा घाबरलेलो होतो. इंटरव्ह्यूमध्ये काय प्रश्न विचारतील याच नेम नसतो. मरीलीन मान्रो कोण होती? पृथ्वीचा व्यास किती? ऑफीसला पायऱ्या किती? तीन जणांच्या कमेटीपुढे मला पाठविण्यात आले. मध्यभागी बसला होता एक ढेरपोटया, टक्कल पडलेला, लालबुंद गोऱ्या गालांचा, मधून मधून नुसतं 'ही:ही:' करत हसण्याचे काम करणारा दैनिकाचा मालक. त्याच्या उजव्या हाताला बसला होता भुंवया पिकलेला, बोट घातले तर अडकून बसेल एवढचा खोल डोळचांचा आणि चिरक्या आवाजाचा प्रधान संपादक, दुसऱ्या बाजूला बसला होता वृत्त-संपादक. मांजरीसारखी चोरटी नजर तो आळीपाळीने मालक व प्रधान संपादकावरून फिरवायचा आणि उगीचच कागद वरखाली करायचा. मी आत पाऊल टाकताच तिघांच्या भेदक नजरेचा प्रवाह एक लाट होऊन माझ्यावर आदळला. त्यात मी नखशिखांत बुडून गेलो. गुदमरल्यासारखे वाटायला लागले.

'बसा' प्रधान संपादकानी खुर्चीकडे इशारा करीत म्हटलं. शिक्षण, अनुभव, पगाराची अपेक्षा इ. इ. चौकशी झाल्यावर वृत्तसंपादकाने एक कागद प्रधान संपादकांच्या हातात ठेवला. प्रश्नांचा भाराच होता तो! शरसंधान सुरू झाले. मग ओठावर रूळणाऱ्या मिशा दातांनी कुरतडत आणि भुवयांचे पांढरे केस उपटत प्रधान संपादकांनी प्रश्न टाकला—

समजा सोफीया लॉरेन शहरात गुप्तपणे उतरली तर तिची बातमी तुम्ही कशी मिळवाल?

सोफीया लॉरेन कशाला इथे घडपडणार होती? काय उत्तर द्यावे सूचेना. मेंदूचे जणु चलनवलन वंद झाले होते. शेवटी वेळ मारून नेण्यासाठी मी म्हणालो, "शहरात आलेली तथाकथित 'सोफीया लॉरेन ही तोतरी असून ती आंतरराष्ट्रीय सोनेरी टोळीची सूत्रधार आहे, अशी बातमी प्रथम मी देईन. मग तिला खरे रूप प्रकट करावेच लागेल.

"ही: ही: छोकरा हुषार दिसते!" टकल्या म्हणाला. त्यावर उरलेल्या दोघानी एका लयीत मान डोलावली.

"वरे राजकीय क्षेत्रात तुमच्या ओळखीपाळखी आहेत?" इति श्री प्रधानसंपादक.

"वा: वा:" मी कोरडे हसून म्हणालो, "आमदार निवासात तर माझी नेहमी चक्कर असते. (स्वगत—कारण तिथल्या कॅंटीनमध्ये 'मिसळ' फार छान मिळते.) माझे काका सुद्धा इंग्रजांच्या गोळीबारात जखमी झाले होते. (वास्तविक 'काका' त्या वेळी भाजीची पिशवी घेऊन येत होते. गोळी चुकून लागली. पण म्यु. पालटीत निवडून यायला ती 'गोळी' अनेक वर्षे लागू पडली होती.) बहुतेक मंत्र्यांना मी ओळखून आहे. (स्वगत: 'खाती' मात्र विचारू नका.)

"ठीक" प्रधान संपादक.

"हे झालं राजकीय क्षेत्राचं. साहित्य क्षेत्राचं काय!" वृत्तसंपादकांनीहि प्रश्न विचारण्याची हौस भागवून घेतली.

"तात्या तर आमच्या गांवचे." मी म्हणालो.

"कोण तात्या?" वृत्तसंपादक

"कविवर्य कुसुमाग्रज. अप्पांना तर मी नेहमी खुषीपत्रं पाठवतो. अप्पा म्हणजे आपले ते ना. सी. फडके."

"सगळयांना अगदी घरगुती नांवाने ओळखता? लिखाण करता की काय? आम्हालाहि कळू द्या."—प्रधान संपादक.

"थोडसं" ह्या ठिकाणी हनुवटी कंठाशी घासत मी चक्क लाजलो होतो. "पण खांडेकरांशी प्रेमाबाबत माझा जरा मतभेद आहेत.

"तो कसा वुवा?" प्रधान संपादक.

"त्याचं असं आहे." मी खांकरून म्हणालो, "खांडेकर प्रेमाचा त्रिकोण हा समकोन असतो या पंथाचे. तर आम्ही (साहित्यिकाने स्वत:ला 'आम्ही' म्हणायचे असते.) त्यातला एक कोन विशाल कोन मानतो."

"ही: ही: लव्हमंदे वी जॉमेट्री असते साला."—मालक.

"जॉमेट्रीच काय अलजिब्रा असतो अलजिब्रा. 'सत्य कथा' वाचा. संवेदना गुणीले प्रज्ञा भागीले अनुभूति. सौंदर्याची पण समिकरणं असतात" मी. मी काही तरी वरळत होतो. पण यातलं कोणाला काही कळलं नसावं असं दिसलं. कोणालाच प्रश्न विचारण्याची हिंमत झाली नाही. 'शेवटी सर्व आटोपलं ना?' अशा अर्थाने वृत्तसंपादकांनी प्रधान संपादकाकडे पाहिले. त्यांनी मालकाकडे. आणि मालकाने "ही: ही!" करून संपल्याचा 'सिग्नल' दिला.

"थोडया वेळाने पुन: या. निर्णय सांगू." प्रधान संपादक म्हणाले.

"बंबईची हवा ज्यरा च्याखून ये." मालकांनी विनोद केला. त्यावर दोन्ही संपादक भयानक हंसले. मी पण माझ्या पोटाला गुदगुल्या करून हंसण्याचा प्रयत्न केला. पण स्वत:च्या हातांनी गुदगुल्या होत नसल्याचे (हे नंतर लक्षात आल्यामुळे) (इ) लाज नसल्याने न हंसताच जावे लागले.

शेवटी नेमणूक पत्र आणि आयडेंटि कार्ड हातात पडले. 'नीट खातरजमा करून बातमी आणा.' 'उगीच कोणाची बदनामी करू नका.' 'मंत्र्यांचे कार्यक्रम कव्हर करा' 'पब्लीक मंदी घुमत जावा' यज्ञाच्या वेळी ब्रह्मवृंदाने मंत्रोच्चार करावे त्याप्रमाणे तिघांनी एका मागोमाग एक गुरुमंत्र दिले.

माझी कारकीर्द सुरू झाली. लग्न लागले तर 'नांदा सौख्य भरे' सोनापुरात गेलो तर 'अमक्याच्या निधनाने जनसागर हेलावला!' बातमी तयार. मंत्र्यांनी 'दगड' वसवला तरी बातमी; मंत्र्याला 'दगड' लागला तरी ती बातमी; 'दगडाला 'दगड' कसा लागणार' अशी उपरोधिक मल्लीनाथी झाली तरी तीहि बातमीच! 'अल्पवयीन मुलींवर बलात्कार' 'तरुणमुलगी पळवली' 'प्रेयसीला भोसकले' अशा बातम्या म्हणजे लोक जिभल्या चाटत वाचणार! हातात वीणा घेत 'नारायण' 'नारायण' मुखाने उच्चारित त्रिखंडात संचार करणाऱ्या नारदाप्रमाणे हातात पॅड आणि पेन घेत 'बातमी' 'बातमी' म्हणत मी त्रिकाळ गल्लीबोळातून फिरू लागलो. नारदाप्रमाणे 'तुम लढो हम कपडे संभालते' या तत्त्वज्ञानाप्रमाणे दोन्ही पक्षांना खेळवू लागलो.

उपोषण आणि संप म्हणजे बातम्यांचा झराच. कोणी आमरण उपोषण करायला वसला रे बसला की १) उपोषणाचा कितवा दिवस २) वजन किती घटले ३) डॉक्टरांचे बुलेटिन काय म्हणते? ४) कोण कोण भेटीला येऊन गेले? ५) मोसंबीचा रस कोणी पाजला? या प्रश्नावलीचे छापील फॉर्मच मी वापरू लागलो. संपाचे पण तसेच. संपाच्या अमक्या दिवशीहि कामगारांचा निर्धार कायम, मालकाच्या 'वेळकाढू' धोरणाचा निषेध! फूटपाडयांचा धिक्कार, वगैरे वगैरे हळू हळू या कामात पूर्णपणे रूळलो. बातम्या पिकवणारे अड्डे माहित झाले.

दोनचार महिने याप्रमाणे सहिसलामत पार पडले. पण एकदा एक काळा दिवस उगवला. सकाळपासून बाराचे ठोके पडेपर्यंत भटकलो, तरी बातमी मिळेना. 'करीअर'ला








बट्टा लागायची वेळ आली. 'मोर्चा नाही', 'निषेध नाही' 'बंद नाही' 'मुलाखत नाही' 'चोरी' नाही. 'बलात्कार' नाही. कमाल झाली. लोकांना झाले तरी काय असा प्रश्न पडला. प्रत्येक पोलीस चौकीत दोन तीनदा डोकावून आलो. एक पोलीस तर माझ्यावर खेंकसलाच "काय सकाळपासून पिरपिर लावली. काही कामधंदा नाही का? सकाळपासून 'काही झालं का विचारता?' आता काय मी स्वतः खिसा कापू की खून करू! बोला" मिशा कुरवाळीत तो म्हणाला.

काय बोलणार ? कपाळ. तेथून यशस्वी माघार घेतली. असा विलक्षण दिवस या शहराच्या जीवनात उगवला होता. त्यादिवशी एकाहि मर्दाचे हात मारामारीसाठी शिवशिवत नव्हते. नळावरती पाण्याच्या भांड्याशिवाय दुसरा आवाज ऐकू येत नव्हता.

केशवसुतांप्रमाणे 'विमनस्कपणे स्वपदे उचलीत रस्त्यातून मी होतो हिंडत.' त्यावेळी समोरा समोरून दोन मोटारी येत असता उंची कपडे घातलेला तरुण मध्ये आला. वाटले आता हा नक्की सांपडणार. 'गाडीच्या-टकरीत तरुणाचा चेंदामेंदा' मी शीर्षकहि तयार केले. पण काय आश्चर्य! त्याला अगदी खेटून दोन्ही गाड्या खर्रकन् उभ्या राहील्या. एक जण तर चक्क त्याचा मित्रच निघाला आणि त्याला बसवून घेत निघून गेला. 'काय मोटारी चालवता की चेष्टा करता? अं? साधा ॲक्सिडेंट जमू नये?' मी त्या दोन्ही मोटार हाक्यांवर मनोमन चरफडलो. एका चांगल्या बातमीला मूकलो म्हणून मला कोण हळहळ वाटली.

झालेल्या घटनेने कडवट चेहरा करून मी जात होतो. पायात त्राण उरले नव्हते. वेड्या पडल्यासारखी पावलं मंद आणि जड पडत होती. समोरून एक पांढरा शुभ्र स्कर्ट घातलेली तरुणी येत होती. मनोऱ्यासारख्या मांड्या, पिरॅमिडसारखी छाती. गॉगल, गोरे गोरे अंग. माझ्याजवळून जात असता साधारण मवाली वाटणाऱ्या एका माणसाला तिच्यावर ढकलले. तिला धक्का चांगलाच लागला. वाटले आता, चप्पल बसणार, पोलीस कंप्लेंट होणार. या कल्पनेने मी हुरळलो. धक्क्याचे तिने काहीच मनावर घेतले नव्हते! स्कर्ट मळाला म्हणून मात्र तिच्या भुवया वक्र झाल्या अन् 'इडियट' असा उद्‌गार ऐकू आला. लगेच तिने पर्समधून रुमाल काढला. मळलेली जागा पुसून काढली. ओठावरून एकवार लिपस्टीकने रंगरंगोटी केली. 'टक् टक्' आवाज करीत ती निघाली सुद्धा. मी कपाळावर हात मारून घेतला. आज कोणाचे तोंड पाहिले? कोण असावा तो दळभद्री? असा विचार येताच सकाळी प्रथम आरसाच पाहिल्याची आठवण होऊन शंकानिरसन झाले.

दमून भागून एका हॉटेलमध्ये घुसलो. भजी मागवली. समोर कोळशाच्या वखारीतील हमालासारखे काळे कुळकुळीत, आडमाप असे दोघे तिघे इसम उघड्या अंगाने बाकावर पायधूळ झाडीत बसले होते. एकजात सगळे 'वांटेड' दिसत होते. जरा भीतीच वाटली मला.

'आज साली भट्टी बरोबर लागली नाही. बॉस कोकलणार' त्यांनी कुजबुज केली. माझे कान मी टवकारले. 'हातभट्टीवाले दादा' दिसतात. चला शेवटी काम झाले. मी मनात विचार केला. ते जाताच मालकांना खाजगी आवाजात विचारलं "मंडळी 'यांतली' तज्ञ दिसतात" मी 'पिण्याचा' अभिनय करीत म्हणालो.

"चुकता आपण. साधे मजूर होते ते."

"मग 'भट्टी' ची काय भानगड आहे बुवा?"

त्यावर 'काय चक्रम माणूस आहे' हा अभिप्राय दर्शवणारा तळवा खाली फेकत तो म्हणाला, 'साहेब भट्टी म्हणजे फर्नेस. ते वेल्डर होते. काय समजलात?

"बाकी मोठीच मजा आली बरं का?" असं वरकरणी म्हणत पण मनात खट्टू होत मी बाहेर पडलो. संध्याकाळ होत आली होती पण दोन ओळीची बातमी मिळाली नव्हती. कचेरीत जाऊन तोंड दाखवायला जागा राहिली नव्हती. एवढं मोठं शहर अन् काही बातमी नाही! यावर कोणी विश्वास ठेवला असता काय?

थोडे अंतर कापतो तोच तीन चतुर्थांश भाग उघडा आणि उरलेला एक चतुर्थांश नायलॉनमधून अस्पष्टपणे दाखवणारी एक पदनिका एका बंगल्यातून बाहेर पडली. नक्कीच सिनेसृष्टीतील 'बाला' किंवा 'कुमारी' डिमले, तिच्या 'मेक्-अप्'वरून मी तर्क केला. रस्त्यावर एका करकरीत मोटारीत भोपळाकृति शेठजी बसला होता. ती येताच त्याने दरवाजा उघडला, अन् हातानी ओढून शेजारी बसवून घेतले. अन् ड्रायव्हरकडे पहात तो म्हणाला, "ज्युहु." 'लखपतीवर रूपवती आषक' अशी बातमी मिळाली तर अंक हातोहात खपून केवढी खळबळ माजली असती. हे घबाड काही सोडून चालणार नाही, असा मुत्सद्दीपणाचा विचार करून मी स्टाइलिशपणे दोन टाळ्या वाजवून 'टॅक्सी' असा आवाज काढला. मग '००7' मधील रहस्यकथेच्या नायकासारखा गंभीर चेहरा करीत म्हणालो, 'वो काली गाडी है ना? उसका पाठलाग करो.'

'क्यों साब?' ड्रायव्हरने गाडी चालवीता चालवीता विचारले?

"तुमको मालूम नसेगा लेकिन उस गाडीमे बडी नटी है, वो जाड्या उसको भगा रहा है।"

"ऐसा" ड्रायव्हर आश्चर्याने दाढी कुरवाळीत म्हणाला आणि त्याने स्पीड वाढवला.

त्या गाडीच्या अगदी मागोमाग येताच ड्रायव्हरने विचारले, "ये हरी साडीवाली?

"अगदी वहीच" मी म्हणालो. त्यावर दोन्ही ब्रेक त्याने खर्रकन दाबले. हात चाकावर ठेवीत सातमजली हंसत तो म्हणाला, "ये और नटी? खीः खीः खी."

"हा काय प्रकार?" मी चिडून म्हणालो.

"साब ऐसी नटी तो फोरास रोडपर पांच आनेसे लेकर पांच सौ रुपये तक मिलती है."

"इसका अर्थ" मी विचारले.

'मतलब, ये एक वेश्या है.' तो म्हणाला. क्षणभर थांबून तो म्हणाला "ये है ?" यावेळी पांचही बोटे त्याने नाचवली.

"पांच रुपये? मिटर नाही कां टॅक्सीला?

"पांच नही साव पांच सौ. रातभर तुम्हारे साथ घुमेगी.

"ये सब खरा है?" मी विचारले.

"खुदाकी कसम, वरना हमारा क्या जाता?" तो म्हणाला.

'ठीक आहे. चलो वापस.'

मनाच्या अत्यंत निराश अवस्थेत मी कार्यालयात शिरलो. एकहि बातमी नाही हे शल्य मनाला खूपत होते. सगळे 'काव काव' करणार! मुख्य संपादकांच्याच कानावर हा प्रकार घालावा म्हणून मी तडक त्यांच्या केबिनमध्ये शिरलो. ते डोकं टेबलावर टेकून बसले होते. पुढे अग्रलेख अर्धवट लिहिलेला पडला होता. लेखणी हातातच होती. 'डुलकी लागली असावी किंवा विचारात गढले असावेत.' त्यांना डिस्टर्ब करायचे माझ्या जिवावर आले होते. तरी हिय्या करून 'साहेब' 'साहेब' म्हणून हाका मारल्या. शेवटी हलवून जागे करावे म्हणून जवळ गेलो. हलवले तर ते तसेच खुर्चीवर मागे कोलमडले. खूपच डाराडूर झोपलेले दिसतात म्हणून मी हलविण्याचे आणि पाणी शिंपडण्याचे सत्र सुरू केले. तरी हालचाल नाही किंवा चाळवाचाळव नाही, माझ्या मनात शंका आली, "कारभार आटोपलेला तर नसेल?" एका हाताने नाडी पाहात मी कान त्यांच्या छातीवर टेकला. हृदयाची धडधड थांबली होती. नाडीचे ठोके बंद पडले होते. संपादक निवर्तले होते! पुन: मी त्यांना त्यांच्या मूळ स्थितीत आणून ठेवले. लेखणी हातात ठेवली. अग्रलेख पुढे ठेवला. खूर्ची ओढून घेत घेत गंभीरपणे बातमी लिहायला प्रारंभ केला "संपादकीय संपताच संपादक संपले."

वृत्तपत्र सृष्टीचा मोहरा गळाला! आणि नाड् ताड् पावले टाकीत वृत्तविभागात ज.ऊन म्हणालो, 'बातमी'' बातमी' म्हणून ठणाणा करता ना? ही घ्या बातमी, चांगली चौकटीत छापा.

क्षणभर त्यांची बुबुळे त्या अक्षरांवरून फिरली. सारे शेजारच्या केबिनमध्ये धावत सुटले. खरंच सांगतो, मी मात्र खुशीत होतो. कारण? कारण अखेर मला बातमी मिळाली होती. ●●●











# भारत-वेस्ट इंडिज क्रिकेट स्पर्धेची फलश्रुति

**झंझावाती गोलंदाजी पार पिंजून काढता येते हे भारताने सिद्ध केले. तसेच गचाळ क्षेत्ररक्षणामुळे हाती आलेला विजय निसटतो याचीही अनेक प्रात्यक्षिके आम्ही दाखविली....आणि तुफानी राहोच, नुसती 'जलदगति' गोलंदाजी...!!!!**

— प्रा. अविनाश केळकर



**एक सोबर्स = ३ वेस्ट इंडिज खेळाडू**

**वेस्ट** इंडीजचा क्रिकेट संघ भारताचा दौरा संपवून मायदेशी परत गेला. गॅरी सोबर्सच्या नेतृत्वाखाली हा जगज्जेता संघ भारताच्या दौऱ्यावर आला त्यावेळी ह्या बलाढ्य संघाबरोबर भारतीय संघ कितपत टिकाव धरील याबाबत जाणकारात उत्सुकता होती. सहा वर्षांपूर्वी वेस्ट इंडीजचे नेतृत्व फ्रँक वॉरेल यासारख्या जागतिक कीर्तीच्या मुरब्बी आणि धूर्त खेळाडूकडे आले. त्याने आपल्या खेळाडूंमध्ये संघभावना निर्माण केली. सर्व दृष्टीने समतोल असणाऱ्या आणि सांघिक भावनेने खेळणाऱ्या या बलवान संघाचा शिल्पकार वॉरेल हाच आहे. सोबर्स आणि त्याचे सहकारी त्याच्याच तालमीत तयार झालेले, अनुभवी खेळाडू.

सोबर्सच्या या संघाने नुकताच इंग्लंडच्या मैदानावर इंग्लंडच्या संघाचा सपशेल फज्जा उडविला. ऑस्ट्रेलियाच्या बलवान संघाचाहि संपूर्ण नक्षा उतरवला. खुद्द भारतीय संघाला तर गेल्या दोन कसोटी मालिकात अक्षरशः पाणी पाजले. आठ वर्षांपूर्वी अलेक्झांडरच्या नेतृत्वाखाली आलेल्या या संघाने भारतीय फलंदाजांच्या फलंदाजीतील मर्यादा उघड केल्या. पांच वर्षांपूर्वी नरी कॉंट्रॅक्टरच्या नेतृत्वाखाली गेलेल्या भारतीय संघाला पांचही कसोटी सामन्यांत चारीमुंडे चीत केले. हॉल, गिलख्रिस्त, ग्रिफिथ या जलदगती गोलंदाजांनी या दोन्ही मालिका गाजविल्या. भारतीय खेळाडू हे जलदगती गोलंदाजांसमोर नांगी टाकतात हा प्रवाद रूढ झाला. भारतीय खेळाडूंना जलदगती गोलंदाजी खेळताच येत नाही असे कुत्सितपणाने हिणविण्यात येऊ लागले.

या पार्श्वभूमीवर सोबर्सच्या बलवान संघाबरोबर पतौडीचा कमजोर संघ काय पराक्रम करतो याची उत्सुकता होती. या बलाढ्य संघाचा पराभव करणे अवघड होते. आणि भारतीय संघाचा पराभवही अटळ होता. या संघाबरोबर झालेल्या तीन कसोटी सामन्यात मुंबई आणि कलकत्ता येथील पहिल्या दोन्ही सामन्यात भारताचा पराभव झाला. मद्रास येथे झालेला शेवटचा सामना अनिर्णित राहिला. या कसोटी मालिकेत भारतीय संघाला विजय मिळाला नसला तरी भारतीय खेळाडूंनी ज्या जिद्दीने आणि सांघिक भावनेने पहिल्या आणि शेवटच्या सामन्यात प्रति-





अनुक्रमणिका

पक्षाला तोंड दिले त्याचे कौतुक अवश्य करायला हवे. या जिद्दी-मुळेच सामने एकतर्फी झाले नाहीत. शिवाय हे दोन्ही सामने पांचव्या दिवसापर्यंत अटीतटीने खेळले गेले. भारतीय संघाबरोबर इंग्लंडने तीन दिवसांचेच कसोटी सामने खेळावे असे सुचविणाऱ्या इंग्रज टीकाकारांना यामुळे आपोआप चपराक बसेल.

मुंबई येथील पहिल्याच सामन्यात हॉल–ग्रिफिथ यांच्या झंझावाती माऱ्यापुढे भारतीय संघ नांगी टाकणार अशी चिन्हे दिसू लागली. सरदेसाई, जयसिंहा, वेंग हे पट्टीचे फलंदाज अल्पावधीत बाद झाले. परंतु नेहमीप्रमाणे चंदू बोर्डेने डाव सावरला. पतौडी–दुराणी यानी त्याला साथ दिली. बोर्डेने स्वतःचे शतक तर फडकावलेच, पण भारतीय संघाची लाज राखली. त्यामुळेच भारतीय संघ २९६ धावा काढू शकला. वेस्ट इंडीजकडून सलामीचा चिवट फलंदाज कॉनराड हंट याने सावधपणे खेळून शतक काढले. लॉइड, सोबर्स, हॉल्फोर्ड आणि हेंड्रिक्स यांनी त्याला साथ दिली. वेस्ट इंडीजने ४२१ धावांचा डोंगर रचला. भारताच्या दुसऱ्या डावात पुन्हा घसरगुंडी झाली. त्यावेळी कप्तान पतौडी पुन्हा आत्मविश्वासाने खेळला. त्याने अर्धशतक काढले. प्रतिपक्षाची गोलंदाजी चोपून काढली बोर्डे–दुराणी लवकर बाद झाले. तथापि कुंदरन् आणि व्यंकटराघवन् यानी उत्कृष्ट फलंदाजीचे प्रात्यक्षिक दाखविले. त्यामुळेच भारतीय संघाला ३१६ धावांची मजल गाठता आली. वेस्ट इंडीजला १९२ धावा विजयासाठी हव्या होत्या. त्यासाठी त्याना चार गडी गमवावे लागले. लॉइड आणि सोबर्स या दोघानी सुरुवातीला चिवटपणे आणि शेवटी झंझावाती खेळ खेळून विजयश्री खेचून आणली. वस्तुतः भारतीय क्षेत्ररक्षकांनी अनेक झेल सोडून त्या दोघांना जीवदाने दिली. ते झेल घेतले असते तर सामना आणखी रंगला असता. या सामन्यात चंद्रशेखरने वेस्ट इंडीजचे अकरा खेळाडू बाद करून आपले कौशल्य दाखविले. या सामन्यात त्याला दुसऱ्या बाजूने दुसऱ्या गोलंदाजाची साथ मिळाली नाही. नाडकर्णीचा योग्य उपयोग केला गेला नाही. वेस्ट इंडीजच्या दुसऱ्या डावात लॉइड–सोबर्स फॉर्ममध्ये येऊन चंद्रशेखरला आत्मविश्वासाने फटके मारू लागले. त्यावेळी त्याची गोलंदाजी काढून दुसऱ्या गोलंदाजाला गोलंदाजी देणे आवश्यक होते. याचा परिणाम असा झाला की, पुढील दोन्ही सामन्यात चंद्रशेखर निष्प्रभ ठरला. या सामन्यात भारताचा पराभव झाला. परंतु भारतीय संघ जलदगती गोलंदाजी आत्मविश्वासाने खेळू शकतो हे सिद्ध झाले. बोर्डे, पतौडी, दुराणी, जयसिंहा, कुंदरन् यानी हॉल–ग्रिफिथचा दबदबा साफ नाहीसा केला. विशेषतः कुंदरन्ने दुसऱ्या डावात ज्या पद्धतीने जलदगती गोलंदाजी चोपून काढली त्यामुळेच अखेरच्या सामन्यात इंजिनियर, वाडेकर, सुब्रह्मण्यम् यांना आत्मविश्वास आला. कुंदरन्ची चौकारांची आतषबाजी प्रेक्षकांच्या लक्षात राहिलच; परंतु हॉल–ग्रिफिथनाही त्याचे स्मरण जन्मभर राहील.



**पतौडी + धडाडी=भवितव्य**

कलकत्याचा दुसरा कसोटी सामना प्रेक्षकांच्या अभूतपूर्व दंगलीने गाजला. पहिल्या दिवशी तर खेळच झाला नाही. खेळपट्टीही खराब झाली. परंतु त्याचा फायदा पाहुण्यानी उठवला. पहिल्या दिवसाच्या अखेर त्यांच्या फक्त २१२ धावा झाल्या. बेदीची गोलंदाजी पाहुण्यांना खेळता आली नाही. दुसऱ्या दिवशी कन्हाय, नर्स, सोबर्स यानी फटकेबाजी करून धावसंख्या ३९० गाठली. परंतु भारताच्या फलंदाजांनी पाहुण्यापुढे नांगी टाकली. फॉलोऑनची नामुष्की आली. दुसऱ्या डावातही पहिल्या डावाप्रमाणेच फलंदाजीचे केविलवाणे प्रदर्शन घडले. यावेळी भारतीय फलंदाजांचा फज्जा उडविला तो विश्वविख्यात ऑफ्–स्पिनर लान्स गिब्ज आणि कप्तान सोबर्स यांनी. पहिल्या डावात भारताच्या अवघ्या १६७ धावा झाल्या. तर दुसऱ्या डावात आमचा संघ १७८ धावात गारद झाला. पहिल्या डावात कुंदरन् आणि जयसिंहा आणि दुसऱ्या डावात जयसिंहा, सुर्ती, बोर्डे आणि हनुमंतसिंग यांनी आपल्या फलंदाजीची शिकस्त केली. परंतु पाहुण्यापुढे त्याना हार खावी लागली.

पहिले दोन्ही सामने पाहुण्यांनी जिंकले. तिसरा मद्रासचा सामनाही ते सहज लीलया जिंकतील, या अपेक्षेने त्या सामन्यासंबंधीचे कुतूहल कमी झाले होते. परंतु क्रिकेटमध्ये अनिश्चितपणाच फार असतो. या सामन्याने भारताची शान वाढली. इभ्रत राखली गेली. शेवटपर्यंत सामना अटीतटीने खेळला गेला. भारताने नाणेफेक जिंकून फलंदाजी पत्करली. पहिल्या दोन सामन्यात संधी न मिळालेला फरूक इंजिनियर या सामन्यात चमकला. उपहारापूर्वीच्या दोन तासात त्याने झंझावाती खेळून ९४ धावा काढल्या. त्याचे शतक उपहारापूर्वी लागले असते तर जागतिक क्रिकेटमध्ये त्याला बहुमानाचे स्थान मिळाले असते. याच सामन्यात बोर्डेने या मालिकेत आपले दुसरे शतक झळकावले. पतौडीने शैलीदार खेळ खेळून ४० धावा काढल्या. सुरतीने नाबाद अर्धशतक काढून त्याला साथ दिली. भारताने या मालिकेतील सर्वोच्च धावसंख्या (४०४) गाठली.

पाहुण्यांनी पहिल्या डावात भारतापेक्षा दोन धावा जास्त काढल्या. कर्णधार सोबर्सचे शतक अवघ्या पांच धावानी हुकले. पहिल्या दोन्ही सामन्यात अपेशी ठरलेल्या बायनोने दोन्ही डावात चांगली फलंदाजी केली. हंट, कन्हाय, लॉईड यांनीही संघाची








धावसंख्या वाढविण्यास मदत केली. भारतीय क्षेत्ररक्षकांनी या सामन्यातही झेल सोडले. कन्हायला १२ धावांवर जीवदान मिळाले. त्याने त्यानंतर ७७ धावा काढल्या. सोबर्सने ग्रिफिथ व हॉल यांच्या साहाय्याने ८ व्या व ९ व्या विकेटसाठी अनुक्रमे ७३ व ८० धावांची भर घातली. चंद्रशेखर व सुर्ती यानी अनुक्रमे चार व तीन बळी घेतले.

भारताच्या दुसऱ्या डावात फलंदाजी गाजविली ती वाडेकर (६७), बोर्डे (४९), हनुमंतसिंग (५०) व सुब्रह्मण्यम् (६१) यांनी. पहिल्या तीन डावांत अपेशी ठरलेले वाडेकर आणि सुब्रह्मण्यम् यांनी मैदान गाजवले. या दोन्ही फलंदाजांनी जलदगती आणि मंदगती अशा दोन्ही प्रकारच्या गोलंदाजीवर जलद धावा काढल्या. यामुळेच भारताला ३२३ धावा काढता आल्या व पाहुण्यांना २९५ मिनिटांत ३२२ धावांचे आव्हान देता आले. पाहुण्यांनी हे आव्हान स्वीकारायचे ठरविले. त्यांच्या सलामीच्या जोडीने हंट व बायनो यांनी ५१ मिनिटात ५३ धावा काढल्या. परंतु पहिले सहा फलंदाज त्यानंतर लवकर बाद झाल्यामुळे कप्तान सोबर्सने ग्रिफिथच्या साथीने आठव्या विकेटसाठी ७७ धावांची अभेद्य भागिदारी करून सामना अनिर्णित ठेवण्यात यश मिळविले. याही सामन्यात भारतीय क्षेत्ररक्षकांनी झेल सोडले. सोबर्सला दोन वेळा जीवदान मिळाले. त्यामुळे पहिल्याप्रथमच वेस्ट इंडिजवर विजय मिळविण्याची भारताला आलेली संधी आपण गमावली. वेदीने आपल्या डावखुऱ्या फसव्या गोलंदाजीने पाहुण्यांच्या पट्टीच्या फलंदाजांना फसविले. प्रसन्नाही यशस्वी ठरला. परंतु क्षेत्ररक्षणाने दगा दिला.

या तिन्ही सामन्यात कप्तान सोबर्सचा खेळ त्याच्या आजपर्यंतच्या लौकिकाला साजेसा झाला. प्रत्येक वेळी त्याने आपल्या संघाची बाजू सावरून धरली. कधी जलद धावा काढून तर कधी चिवटपणे खेळून. त्याची गोलंदाजीही संघाच्या दृष्टीने महत्त्वाची. कधी मध्यमगती तर कधी फसवी गोलंदाजी करून त्याने भारतीय फलंदाजांच्या फटकेबाजीला लगाम घातला. त्याने तीन कसोटी सामन्यात १४ बळी घेतले. त्याचे क्षेत्ररक्षणही अप्रतिम होते. त्याचे नेतृत्त्व वॉरेलप्रमाणेच आक्रमक होते. "सोबर्स म्हणजे वेस्ट इंडिजचा निम्मा संघ" हे समीकरण त्याने याही मालिकेत सार्थ असल्याचे पटवून दिले. गोलंदाजीत गिब्जने सर्वात जास्त १८ बळी घेतले. त्याचे फसवे, ऑफ स्पिनर्स खेळणे भारताला अवघड गेले. त्याला यशस्वीपणे तोंड दिले ते वाडेकर, हनुमंतसिंगाने शेवटच्या सामन्यात. इतर प्रत्येक डावात त्याने भारतीय फलंदाजांस जेरीस आणले. हॉल आणि ग्रिफिथ यानी अनुक्रमे ८ व ९ बळी घेतले. फलंदाजीत पाहुण्यांच्या हंटने सोबर्सप्रमाणेच सातत्याने फलंदाजी केली. पहिल्याच सामन्यात त्याने शतक काढले. पाहुण्यांचे इतर खेळाडू शतके झळकवू शकले नाहीत. तरीही प्रथमच कसोटी सामन्यात पदार्पण करणाऱ्या लॉइडने सातत्याने तडाखेबंद फलंदाजी केली. आमच्या गोलंदाजांचा धुव्वा उडविला. कन्हायनेही दोन डावात जीवदाने घेऊन ७७ व ९० धावा काढल्या. बुचर आणि नर्स हे पट्टीचे फलंदाज भारताची फसवी, मंदगती गोलंदाजी आत्मसात् करू शकले नाहीत. पाहुण्यांचे क्षेत्ररक्षण भारतापेक्षा सरस होते.



"...त्या दिवशी दुसरी कसलीच शिकार जमली नाही."

भारतीय फलंदाजीचा विचार करताना प्रथम विचार येतो तो बोर्डेचा. कलकत्त्याचा दुसरा सामना सोडला तर प्रत्येक वेळी बोर्डेने आत्मविश्वासाने खेळून भारताची शान राखली. दोन शतके काढण्याचा सन्मान मिळविला. कुंदरन्, पतौडी, वाडेकर, सुब्रह्मण्यम, हनुमन्तसिंग, इंजिनियर, दुराणी यानीही आपल्या फलंदाजीतले नैपुण्य अधूनमधून प्रकट केले. परंतु कलकत्त्याच्या खराब खेळपट्टीवर खेळून भारताचा पराभव टाळणे त्याना शक्य झाले नाही. आमच्या खेळाडूंना इंग्लंडमध्ये अशाच खेळपट्ट्यांवर खेळावे लागणार आहे हेही लक्षात घ्यावे. भारतीय गोलंदाजात चंद्रशेखरने गिब्जइतक अठरा बळी घेतले. वेदी, प्रसन्ना एका सामन्यात चमकले. परंतु व्यंकटराघवन्, दुराणी यशस्वी झाले नाहीत. नाडकर्णीचा निर्धाव षट्के टाकण्याचा लौकिकही पहिल्या सामन्यात नाहीसा झाला. फलंदाजीतही सरदेसाईसारख्या भरंवशाच्या खेळाडूने निराशा केली. क्षेत्ररक्षणात आपली अजून बरीच प्रगती व्हायला हवी. विशेषतः झेल पकडणे, धावत जाऊन चेंडू अडविणे यात आपण पाहुण्यांपेक्षा बरेच मागे आहोत. यष्टिरक्षणातही पाहुण्यांचा यष्टिरक्षक हेंड्रिक्स आपल्या कुंदरन्-इंजिनियरपेक्षा वरचढ होता. पाहुण्यांचे क्षेत्ररक्षण आमच्यापेक्षा वरचढ असले तरी भारताची मंदगती, फसवी अचूक गोलंदाजी त्यांच्या पट्टीच्या फलंदाजांची डोकेदुखी ठरली.

वस्तुतः बुचर आणि नर्स हे त्यांचे भरंवशाचे ख्यातनाम फलंदाज. इंग्लंडबरोबर या दोघांनी सातत्याने चांगली फलंदाजी केलेली. भारतीय गोलंदाजीवर हे वीक्स-वॉरेल-वॉलकॉटप्रमाणे धावांचे डोंगर रचणार अशी भाकिते करण्यात आली होती. परंतु या दोघांनाही लवकर बाद करण्यात आमच्या संघाने यश मिळविले. पाहुण्यांकडून कसोटी सामन्यात हंटचे एकुलते एकच शतक नोंदविले गेले. तर भारताकडून बोर्डे दोन व इंजिनियर एक अशी एकूण तीन शतके नोंदविली गेली. कसोटी सामन्यात पाहुण्यांना आपण हरवू शकलो नसलो तरीही इंदूरला झालेल्या तीन दिवसाच्या सामन्यात हनुमंतसिंगच्या नेतृत्त्वाखाली गुहा-गोस्वामीच्या अप्रतिम मध्यमगती गोलंदाजीवर आपण त्यांना हरवू शकलो. त्यामुळे पराभवाच्या दुःखातही दिलासा लाभावा. या कसोटी मालिकेत आपल्याला अपयश आले ते प्रामुख्याने गलथान क्षेत्ररक्षणामुळे. शिवाय खराब खेळपट्टीवर आपले नामवंत फलंदाजही निष्प्रभ ठरतात हे कलकत्त्याच्या सामन्याने पुन्हा एकदा दाखवून दिले. आणि आघाडीची गोलंदाजी? ती तर आपली कायमची डोकेदुखी आहे.

● ● ●

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



# कै. पं. ज. वि. पेठे
## रागदारी व कॉलेज विद्यार्थी

२

**कै. पं. ज. वि. पेठे यांचा परिचय आणि त्यानी लिहून ठेवलेल्या आठवणींचा प्रारंभ 'मे' अंकापासून झाला.... जीवनातील बरेवाईट नानाविध प्रसंग आणि त्यामुळे संगीततज्ञाला घडणारे तत्कालीन समाज--दर्शन हे या आठवणींचे वैशिष्ट्य....त्या सत्यकथांचा हा दुसरा हप्ता....**

एकदा मुंबईहून लाहोरला जाण्याच्या तयारीत असताना नागपूरहून मित्रवर्य वि. म. कू. यांची तार आली, "नागपूरला तुमचा गाण्याचा कार्यक्रम नक्की केला आहे. तरी व्हाया नागपूरहून लाहोरला जावे." स्वभाव भिडस्त असल्याने मित्रांच्या आज्ञेला मान तुकविणेच प्राप्त होते.

मी ठरल्याप्रमाणे नागपूर येथे पोहोचलो. गायनाचा कार्यक्रम कोठे आहे? असा प्रश्न विचारता, युनिव्हर्सिटी-युनियनमध्ये हे उत्तर मिळाले. त्याबरोबर मी चमकलो. कारण नागपूर युनिव्हर्सिटी त्यावेळी गायनाच्या कार्यक्रमांबद्दल फारच बदनाम होती. मुंबई-पुण्याचे प्रतिष्ठित गायकही तेथे कार्यक्रम घेण्यास त्यावेळी धजत नसत. कारण कॉलेज-कुमारांचा हल्लाहुल्ला, आरडाओरडा, शिट्ट्या व टाळ्यांचा कडकडाटच तेथे जास्त व्हावयाचा, व गवयाला बेइज्जतीनेच तेथून परतावे लागत असे. त्या कुमाराना नेमके काय पाहिजे ते सांगणे कठीण असे. त्यामुळे पुष्कळ वेळा तेथील कार्यक्रमाचा बोऱ्या वाजून गवयाला अपमानित व्हावे लागे, अशी कीर्ति माझ्या कानावर पूर्वीच बरेच वेळा आली असल्याने माझेही मत युनिव्हर्सिटीत गाणे करावयाचे नव्हते. मला अगोदर माहीत असते, तर त्या कार्यक्रमाला मी नक्कीच नकार दिला असता. थोड्याच वेळाने माझ्याकडे युनियनचे सेक्रेटरी आले, व म्हणाले, तुम्ही जी गाणी व राग म्हणणार आहात त्यांची टिपणे आम्हाला द्या. आम्ही ते छापणार आहोत. अगोदर तेथे कार्यक्रम करावा की नाही याचाच मनामध्ये निश्चय होईना. तेथे गाणी कोणती द्यायची हा प्रश्नच निराळा होता. पण मित्रांच्या सल्ल्याने कार्यक्रम द्यावयाचे असे ठरले. आणि साधारण दोन ते अडीच तासाच्या कार्यक्रमाची गाणी व राग त्याना लिहून दिले.

ठरल्यावेळी सफेद पँट, काळा कोट, टाय वगैरे अपटुडेट पोषाखात मित्रांसमवेत हॉलमध्ये पोहोचलो. मुला-मुलींचा भरणा व्यवस्थित होता. इतरही काही निमंत्रित मंडळी हजर होती. काही प्रोफेसर पण होतेच. प्राध्यापक ना. के. बेहेरे यानी प्रास्ताविक भाषण करून माझी ओळख करून दिली, व मला गाणे सुरू करण्याविषयी सुचविले.

पहिले एक गाणे मुलानी पचविले तर मग मी नक्कीच त्यांचेवर मात करीन, असे मी मित्रवर्य अण्णा याना त्यावेळी म्हटले. पण पहिलेच गाणे व ते सुद्धा विलंबित ख्याल करून ते पचनी पाडावे कसे, याचाच विचार पडला. गाण्यास सुरुवात तर केलीच. प्रथम धडधडत्या छातीनेच गात होतो. पण पांच दहा मिनिटांच्या शांततेनंतर धीर आला, व मग बेफाम होऊन सुरुवात केली. पहिला विलंबित ख्याल व द्रुत साधारण अर्ध्या तासावरच संपविला. कारण त्याहून जास्त डोस विद्यार्थ्यांना पचलाच नसता. पहिल्या गाण्याला समाधानाच्या टाळ्या घेतल्यानंतर आणखी हुरुप आला, व मग एक तिलंगमधील मराठी गाणे, 'अशी ही नटे चारुता' हे सुरू करताच हर्षध्वनीने टाळ्या वाजवून लोकांनी पसंत असल्याची ग्वाही दिली. ते गाणे पण चांगलेच रंगले. नंतर कॉफीमधील एक होरी ठुमरी पद्धतीने सुरू केली. तिला पण चांगलाच रंग भरला व आजचा कार्यक्रम अखेरपर्यंत नक्कीच यशस्वी होणार याची खात्री पटून आत्मविश्वासाने गाणे सुरू झाले.

मध्यंतरी अर्ध्या तासाचा विश्राम झाला. चहा पिऊन ताजातवाना झालो. विश्रांतीच्या वेळी बऱ्याच जणानी कार्यक्रम छान




केल्याबद्दल कौतुक केले. अशा रीतीने रात्री बारा वाजता कार्यक्रम संपला. आभारप्रदर्शनाचे काम पुन्हा श्री. ना. के. बेहेरे यानी केले. बऱ्याच वर्षांत इतक्या शांततेने येथे संगीताचा कार्यक्रम झाला नसल्याचे सांगितले. अशा तऱ्हेने गुरुमहाराजांच्या कृपेने एका मोठ्या प्रसंगातून यशस्वीपणे पार पडलो. नागपूरमध्ये माझे नांव चमकून, त्यानंतर कित्येक वर्षे तेथील निमंत्रणे घेऊन कार्यक्रम पार पडले. मला वाटते त्या सफलतेचे मुख्य कारण म्हणजे माझा अपटुडेट पोषाख व थोडेबहुत व्यक्तित्व हेच असावे. त्यानंतर गाण्याचा प्रभाव.

त्या यशस्वी मैफिलीने मला त्याच वेळी इतरही काही कार्यक्रम मिळाले. तेही रंगले. सारांश विद्यापीठाच्या ज्या कार्यक्रमाची धास्ती वाटली, त्याच्याचमुळे नागपुरात ख्याति झाली. नशीब एकेकाचे...दुसरे काय? ☆☆

## राजेसाहेब बेशुद्ध पडले

सुमारे पन्नास पंचावन्न वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. लाहोरच्या सनातन धर्म-मंदिरात पं. विष्णु दिगंबर पलुसकर यांचे गायन होते. त्या बैठकीला लाहोरमधील लब्धप्रतिष्ठित मंडळी प्रामुख्याने हजर होती. कपुरथळा, नाभा, पतियाळा इत्यादि संस्थानांचे राजेसुद्धा खास आमंत्रणावरून त्या मैफिलीची शोभा वाढवित होते. ते राजेमहाराजे स्टेज समोरच्याच खुर्च्या-सोफ्यावर विराजमान झाले होते.

गुरुजींनी गायन सुरू केले. आपल्या आवाजाच्या व गळ्याच्या जादुगिरीने सर्वानाच मोहित केले. जसजसे गाणे रंगत चालले, तसतसे श्रोते मुग्ध मनाने, तल्लीनतेने समाधिस्तच झाले. काही वेळाने गुरुजींनी त्यांच्या खास खास रागांपैकी 'मल्हार' सुरू केला. त्याच्या आलाप-विस्ताराचे कौशल्य दाखवून, बोलतानांची झडप सुरू केली. आणि तबलजीशी लढत देण्यास सुरुवात केली. श्रोत्याना त्या झडपेने आनंद-विभोर करून सोडले. गुरुजींनी तानांची फिरक गमकाने सुरू केली, तेव्हा तर मेघांच्या गडगडाटाचाच भास होऊ लागला. हळुहळू ते लहान गडगडाट मोठ्याने गर्जावयास लागल्याचा भास होऊ लागला. श्रोते या अद्भूत प्रकाराने दंग होऊन गेले.

तेव्हा गुरुजींनी तीन तीन सप्तकांची तानांची भरारी सुरू केली, व मध्यंतरी एक तान चमकदारपणे अशी घेतली की, मेघांचा गडगडाट एकदम धडाक्याने सुरू झाल्याचे श्रोत्याना वाटले. तोच गुरुजींनी त्या तानेचा शेवट करताना एका स्वरावर विशिष्ट आघात करून समेचा इषारा हाताने केला, तो नाभा संस्थानच्या महाराजांचे रोखाने. त्याबरोबर त्या संस्थानिकाला डोक्यावर वज्रपात झाल्याचाच भास झाला व त्या धक्क्यानेच ते किंचित् काल बेशुद्ध झाल्यासारखे झाले. त्यांची छाती धडधडू लागली. त्याबरोबर गुरुजींनी गाणे बंद केले. इतर जाणत्या लोकांनी त्या संस्थानिकांवर पाणी वगैरे शिंपडून त्याना लगेच शुद्धीवर आणले. खरा धक्का नव्हताच तो. पण खऱ्या धक्क्याचा भास करून देणाऱ्या गुरुजींच्या आवाजाचीच धडक होती ती. तिचा परिणाम इतका गंभीर होईल, असे मात्र कोणालाही वाटले नव्हते.

गुरुजींचा तो आवाज त्यांच्या हयातीनंतर बहुधा कोणालाच अजूनपर्यंत ऐकू आला नसावा—निदान मला तरी नाहीच नाही. ☆☆

## अंगुरी बागेला अलविदा

१९४७ मे-जूनमधील गोष्ट. लाहोरला हिंदू-मुस्लिम दंगे जोरानेच सुरू झाले. रस्त्याने जाणे-येणेसुद्धा कठीण झाले. बाहेर गेलेला मनुष्य घरी सुखरूप येईपर्यंत काळजीच वाटायची. कारण केव्हा, कोणाला, कोठे सुरा मारला जाईल याची शंका प्रत्येकाच्या मनात ठाण देऊन बसलेली. प्रत्येकाचा जीव धडधडतच असावयाचा.

ज्याना शक्य होते ते लोक बाहेरगावी सुरक्षित ठिकाणी निघून गेले. जे राहिले ते काही कारणानी राहणे भाग पडले म्हणूनच राहिले. रोज जिकडे तिकडे आगी लागत. घरेच्या घरे, दुकानेच्या दुकाने भस्मसात् होत. रात्रीचे वेळी हे दृश्य बहुधा रोजच नजरेला पडत असे. सायंकाळपासून संचारबंदी असे. तरीही मुसलमानांचा शे दोनशेंचा जमाव आरडाओरडा करीत, मुस्लिम लीग झिंदाबादच्या आरोळ्या ठोकीत, ढोल वाजवीत तुरळक हिंदु वस्ती असेल तेथे हल्ला करून लुटालूट, जाळपोळ अत्याचार करीत असे. हे प्रकार पुढे पुढे तर सरसहा होऊ लागले होते.

त्यावेळी उन्हाळा असल्याने आम्ही गच्चीवरच झोपत असू. झोप कसली ती? काळजीनेच हातपाय पोटात घेऊन पडून रहात होतो, व गेली रात्र ती आपली म्हणून दुसऱ्या रात्रीच्या त्याच प्रसंगाला तोंड देण्यासाठी मन घट्ट करीत होतो. अशाच एका रात्री बारा-एकच्या सुमारास आमच्या घरापासून साधारण तीन एक मैलांवरील चौबुर्जी—कृष्णनगरजवळच्या भागात मोठ्या फटाक्यांचा आवाज सुरू झाला. कानठळ्या बसविणाऱ्या त्या






आवाजाने आम्ही पलंगावरून ताडकन् उठून त्या दिशेस पाहू लागलो. तो जिकडे तिकडे निरनिराळ्या रंगाचे आगीचे गोटे फेकले जात असल्याचे दृश्य पाहून उर धडकला. काय प्रकार होता तो, हे समजण्यास मार्ग नव्हता. तो हल्ला होता हे कळले. पण हिंदूंवर की मुसलमानांवर? तो प्रकार जवळजवळ तीन तास चालला होता. नंतर मिलिटरीच्या गाड्या तिकडे गेल्याचे आवाज आले. आणि मग एकदम भीषण शांतता. पण त्या रात्री आम्हाला कोणालाच झोप नव्हती. आमचा एकुलता एक मुलगा विजय त्यावेळी चार पांच वर्षांचा होता. तो रात्री एकदा जो गळ्याला मिठी मारीत असे तो थेट दिवस उजाडेपर्यंत. दुसरे दिवशी समजले की तेथे खालच्या जातीतील ४००–५०० मुसलमानांची (धोबी वगैरे) वस्ती होती. चार पांच युवकांनी चारी बाजूंनी बाँबफेक करून त्या वस्तीचा सफाया केला होता. त्यानंतर लाहोरमधील मुसलमान जरा वचकूनच होते. असे प्रकार रोज कोठे ना कोठे चालत. मुसलमानांचा जोर असेल तेथे हिंदूंचा सत्यानाश व हिंदूंचा जोर असेल तेथे मुसलमानांचा सत्यानाश करण्याची जणू हमरी तुमरीच चालू होती. आत्ता वर्णन केलेला प्रकार संघाच्या युवकानी घडवून आणल्याचे म्हणतात. **एक गोष्ट मात्र नमूद करण्यासारखी ही की रा. स्व. संघाच्या लोकांनी पुष्कळ हिंदूंना मदत करून त्यांचे प्राण वांचविले, व अखेरपर्यंत त्यांच्या घरांचे संरक्षणही करीत राहिले. पण फाळणीच्या चार दिवस अगोदर म्हणजे १० ते १४ ऑगस्टपर्यंत हिंदूंची साठ हजार घरे लुटली गेली. आणि थोड्याच अवधीत 'निर्हिदु' पाकिस्तानची निर्मिती झाली.**

लाहोर सोडण्याचा निश्चय आम्ही दहा बारा जणानी ४७ च्या जुलैत केला. त्यापूर्वी एक महिना एकदा विचार करून जाण्याचा दिवसही नक्की केला होता. पण त्याचवेळी पाकिस्तानातून हिंदुस्तानात जाणारी, पंधराशे हिंदू उतारूंनी भरलेली आगगाडी, अडविली गेली. एकूण एक उतारूला ठार मारण्यात आले व पाकिस्तानचा हिंदुस्तानला नजराणा म्हणून ती गाडी पाठविण्यात आली, असे ऐकून मनाला चटकाच बसला. व भीतीने त्यावेळी जाण्याचे सर्वांनीच रद्द केले. त्यानंतर लगेच तसाच तोहफा (नजराणा) हिंदुस्तानने पाठविल्याचे समजले. ती देवाण-घेवाण मोठ्या प्रमाणात सुरू झाली होती. आमची तर मतीच गुंग झाली. त्यानंतर काही दिवस भयाण शांतता होती. तेव्हा संधी साधून पुन्हा एक दिवस लाहोर सोडावयाचे ठरविले. सेकंड क्लासच्या दोन डब्यांमधे बारा जागांची व्यवस्था केली. आणि त्यासाठी पेशावर ते मुंबई तिकिटाचे पैसे भरले.

निघण्याचा दिवस आला. पण स्टेशनवर जाणार कसे? त्या बाजूला मुसलमान वस्ती फार. त्यामुळे हिंदू टांगेवाले तिकडे जाण्यास तयार नव्हते. आमच्याबरोबर तीन चार महाराष्ट्रीयन बायका; व मुलेबाळे. त्यातील एक मूल तर एकच महिन्याचे होते. त्या सर्वांसहित सुरक्षितपणे स्टेशनवर जाणे हीच एक समस्या होऊन बसली. तेव्हा माझे एक मित्र श्री. रमेशचंद्र महान यांना मी भेटलो, आणि निदान बायका मुलांना तरी त्यांनी त्यांच्या मोटारीतून स्टेशनवर न्यावे, अशी विनंति त्याना केली. ते म्हणाले, "सायंकाळी पांचपासून संचारबंदी सुरु होते. तेव्हा दुपारी चार वाजता मी त्यांना स्टेशनवर सोडू शकेन." आम्ही त्याला तयार झालो. दोन-तीन टांगे जास्त पैसे देऊन ठरविले. जे सामान बरोबर नेणे शक्य होते तेवढेच घेतले व आम्ही निघालो. बायका-मुले मोटारीतून आली. एकदाचे स्टेशन तरी सुखरूपपणे गाठले. स्टेशन अगदी भकास दिसत होते. पॅसेंजर किंवा इतर कोणीहि फारसे लोक त्यावेळी तेथे नव्हते. प्लॅटफॉर्मच्या मधोमध सामान ठेवले. त्याभवती बायकामुले आणि त्यांचे भवती आम्ही चारी बाजूंनी वर्तुळाकार बसलो. काही जण उभे राहिले. कारण लक्ष सगळीकडेच ठेवणे भाग होते. गाडी तर रात्री नऊ वाजता यावयाची! पाच ते नऊ–चार तासांचा वेळ आम्ही कसा काढला ते आमचे आम्हालाच माहीत. कोणी हल्ला करते की काय ही भीति क्षणाक्षणाला भेडसावीत होती. त्या धाकधुकीत कसातरी वेळ गेला. दैव इतकेच की फ्रंटियर-मेल बरोबर नऊला स्टेशनात धडकली. आम्ही सामान–सुमानासह आत बसलो. गाडीचा गार्ड अँग्लो-इंडियन होता. "दाराना आतून कुलूप लावा व रात्री कोणत्याही स्टेशनवर उतरू नका किंवा खिडक्याही उघडू नका. मी ज्यावेळी इशारा करीन–त्याचवेळी दार उघडा. कारण केव्हा, कोठल्या स्टेशनवर काय होईल याचा नेम नाही" अशी ताकीद देऊन तो निघून गेला. गाडी चालू झाली. . .थोडे सुटकेचे, बरेचसे भीतीचे दडपण घेऊनहि आमची तोंडे तेव्हा कोठे उघडली! मुले बिचारी हैराण झाल्याने केव्हाच झोपली. आम्ही मोठी माणसे फराळ करीत गप्पा मारीत रात्रभर जागलो. फराळ? हो कारण खरे म्हणजे निघण्यापूर्वी दोन दिवस आम्ही जेवत होतो, म्हणजे केवळ अन्न उष्टावीत होतो. आणि निघालो त्या दिवशी खाणे भागच होते. पुन्हा जिवानीशी जेवण मिळते वा नाही, याचीही धास्ती पडलेली होती. . .झोप कोणालाही येणे शक्यच नव्हते. एकादेवेळी चुकून डोळा लागावयाचा एवढेच. पण पुन्हा दचकून तो लवकरच उघडावयाचाहि!

अखेर ती काळरात्र संपली. दिवसहि चांगलाच वर आला. गाडी गाझियाबादला आली. तेव्हा आम्ही खिडक्या-दरवाजे उघडून बाहेरचे जग पाहू लागलो. नंतर दिल्ली. तेथे फराळ व चहा आटोपला. पुन्हा प्रवास सुरूच. विभाजनानंतर परत कसे यावयाचे याच गप्पा सबंध दिवस सुरू होत्या. पण त्या जमिनीला पुन्हा पाय म्हणूनसुद्धा लागावयाचा नव्हता हे नियतीचे आकलन कोणलाच झाले नव्हते! आम्ही लाहोर सोडले, ते कायमचेच! कालाय तस्मै नमः हेच खरे!

☆☆

## ऑऽऽ परीक्षक हे ? ?

**पंजाब विद्यापीठाने इंटर व बी. ए. पर्यंत संगीत विषयाला स्वतंत्र स्थान दिल्याने संगीताचा दर्जा वाढू लागला. त्या विषयाचे**

अनुक्रमणिका

तज्ञ कोण कोण आहेत; ते जबाबदारीचे काम कोण शिक्षक सांभाळू शकतील, अशी चौकशी विद्यापीठातील काही जबाबदार मंडळी करू लागली. संगीत विभाग प्रमुख म्हणून श्रीमती शामा झुत्सी (एम. ए.) यांची त्यावेळी नियुक्ती झाली होती. कॉलेजातून तो विषय शिकविण्यासाठी प्राचार्यांची निवड व्हावयाची होती. त्यासाठी काही लोकांची प्रत्यक्ष चांचणी घेऊन त्यांची नांवे 'योग्य शिक्षक' म्हणून पटावर नोंदवावीत आणि त्यांना शिकविण्याची परवानगी द्यावी असे ठरले.

चांचणी परीक्षेसाठी उमेदवारांकडून अर्जाबाबत जाहिराती सर्व वृत्तपत्रातून झळकल्या. त्या परीक्षेत पास झाले की नोकरी ठेवलेलीच असा पुष्कळांचा समज त्यामुळे झाला होता. पण खरी मख्खी अशी होती की नोकरीची शाश्वति नव्हती. फक्त 'योग्य' म्हणून निवड नोंदविली जात होती. आणि त्यापैकी मर्जीला येईल तो शिक्षक घेण्याची मुभा कॉलेजाना होती.

मी स्वतः एका संगीत संस्थेचा प्रमुख. त्या क्षेत्रात माझे नांवहि बऱ्याच वरच्या पातळीवर. तेव्हा चांचणी परीक्षेत भाग घ्यावा की न घ्यावा असा विचार मनात घोळू लागला. मान तर राखला जावा, पण कार्य तर व्हावे हा हेतू मनात धरला. माझे एक परमस्नेही श्री. वि. म. कुळकर्णी (बी. ए. एलएल. बी.) यांचे सल्ल्याने माझ्या नांवाने एक पत्र कुलपतींना पाठविण्याचे ठरविले. त्यात असे म्हटले होते की, "संगीत शिक्षकांच्या निवडीसाठी चांचणी परीक्षा घेणार असल्याचे समजते. आपणास योग्य शिक्षकांची जरुरी असल्यास मला कळवावे. योग्य त्या माणसांची नांवे मी आपणास सुचवीन." त्या पत्राचा परिणाम मात्र विलक्षणच झाला. उपकुलपती श्री. फजल हुसेन यांचे पत्र आले की "चांचणी–परीक्षेचे एक परीक्षक म्हणून माझी निवड झाली आहे." हा एक अनपेक्षितच प्रसंग होता.

परीक्षा पंधरा दिवसानंतर व्हावयाची होती. माझ्या पुष्कळशा समव्यावसायिकांनी त्या परीक्षेसाठी अर्ज दिले होते. माझी जेव्हा कोणाशी भेट होई, तेव्हा ते मला विचारीत, "क्यों पंडितजी आपने भी अर्जी दी होगी?" मी नुसते स्मित करून वेळ साजरी करीत असे. माझ्या ओळखीचे एक गुरुबंधूहि त्याचवेळी लाहोरलाच होते. ते मजपेक्षा वयाने, विद्येने श्रेष्ठ व आदरणीय असे होते. परंतु मी लहान वयात साधलेल्या उत्कर्षामुळे त्यांच्या मनात जरा अढी निर्माण झाली होती. एकदा ते रस्त्यात भेटले. त्यावेळी मी त्याना त्यासंबंधी छेडले. तेव्हा ते म्हणाले "छे छे! मी या असल्या क्षुल्लक परीक्षेला कशाला जाऊ?"

मी म्हणालो, "बरोबरच आहे. तुमची चांचणी कोण घेणार? तुमचे नांव तसेच प्रसिद्ध आहे. ते त्या परीक्षेत भाग घेणे शक्यच नाही, ही गोष्ट मलाही खरी वाटली. नंतर परीक्षेचा दिवस येऊन ठेपला, त्या दिवशी परीक्षक म्हणून हजर रहाण्याची रीतसर लेखी सूचनाहि मला विद्यापीठाकडून आली. परीक्षेच्या दिवशी सकाळीच अमृतसर येथून माझ्या एक 'संगीत अलंकार' भगिनी माझ्याकडे उतरल्या. लाहोरला रेडियो वा अन्य कार्यक्रमासाठी त्या नेहमीच माझ्याकडे उतरत असत. 'मध्येच कशा?' असा प्रश्न मी त्याना विचारला. 'सहजच आले. मला एके ठिकाणी भेटावयास जाणे आहे,' असे मोघम उत्तर त्यानी दिले. पण कोठे जावयाचे, ते सांगण्याचे टाळले. मी पण त्याबाबत आग्रह धरला नाही.

परीक्षा दुपारी तीनला होती. त्या भगिनी दोनच्या सुमारास माझा निरोप घेऊन गेल्या. अडीच वाजता मी टांगा करून निघालो. चांचणीच्या ठिकाणी तीनला दहा मिनिटे असताना पोहोचलो. तेथे बरीच ओळखीची मंडळी भेटली. जरा वेळ त्यांचेशी इकडच्या तिकडच्या गप्पा मारल्या. तेवढ्यात एक चपराशी माझे नांव घेत घेत तेथे आला. व साहेबानी बोलाविल्याचे त्याने सांगितले. तेव्हा इतराना वाटले की प्रथम माझीच परीक्षा होणार.

मी आत गेलो. तेथे रायबहाद्दूर गोपाळदासजी, श्रीमान दलिया रामजी, प्रा. ठाकूरदास ही मंडळी भेटली. चांचणीची पद्धत नक्की केली. ठराविक प्रश्नोत्तरानंतर एखादे गाणे ऐकावयाचे व पंधरा-वीस मिनिटात मुलाखत संपवायची, असे ठरले. आणि चांचणी सुरू झाली. एकेक व्यक्ति चांचणीसाठी येऊ लागली. आत येणाऱ्या व्यक्तीची नजर जेव्हा माझ्यावर पडे, तेव्हा त्यांच्या लक्षात येई की, मी परीक्षार्थी नसून परीक्षक आहे. त्यामुळे बरीच खळबळ झाली.

माझेकडे आलेल्या माझ्या भगिनी तसेच आमचे आदरणीय गुरुबंधू समोर येऊन बसले. पण करणार काय? मला वाईटहि वाटले. ते नसते आले तरीहि त्यांचे नांव मी निवडले असतेच. तथापि ते आल्याने मात्र लहान तोंडी मोठा घास घेण्याचा प्रसंग ओढवला. असे प्रसंग आयुष्यात क्वचितच पण ते महत्वाचेच ठरतात. त्यावेळेपासून "संगीत परीक्षक" म्हणून पंजाब विद्यापीठात माझी नेमणूक झाली. ते कार्य मी अगदी लाहोर सोडेपर्यंत (१९४७) सफलतेने पार पाडले.

[क्रमशः]










**बाटलीत 'बू' सांपडला**
**पण हे 'बू' काय प्रकरण ?**

**बू म्हणजे भुताच्या भाषेत त्या पोराचं नांव – रंगोबा मास्तर आणि विल्यम डंकन कोळी यांचा संवाद चांगलाच रंगू लागला. डंकनने एकेक म्हणी भिरकावण्यास सुरुवात केली. म्हैस रवंथ करीत होती. पार्डी शांतपणे झोपली होती. मास्तरांच्या डोक्यात तुफान उठलं होतं. आयऽला वही खिशात असती तर हे चर-वाङमय तरी टिपता आलं असतं––**

**रंगोबा** मास्तरांना ओळखीत नाही असा इसम उभ्या गांवात सापडणं कठीण ! माणूस जितका उमदा तितकाच भोळा न् तऱ्हेवाईक ; एककल्ली, नादी – छंदी ! कुठल्याही गोष्टीचा पगडा त्यांचे मनावर बरेच दिवस पडायचा – कॅन्सरवर वाचलं कां कॅन्सरची सारी लक्षणं ह्यांच्या वाट्याला आल्यागत व्हायची. साहस आणि रोमान्सच्या गोष्टी वाचल्या की संकटात सांपडलेल्या एकाही सुंदरीची करुण किंकाळी आपल्या कानी कां पडली नाही, याचं त्याना आश्चर्य वाटायचं–त्याऐवजी शाळेतल्या कळकट अन् शेंबड्या लेंबड्या पोरांचा गोंगाटच आपल्या वाट्याला यावा याचं वैषम्य करीत ते बसायचे पण थोड्याच दिवसांनी त्यांचा तो रोमँटिक ताप उतरायचा अन् मग त्यांच्या रिकाम्या मनात एकादं नवं मनोराज्य बिऱ्हाडकरू म्हणून यायचं–गोविंदाग्रजांची वाग्वैजयंती वाचली आणि बरेच दिवस एक खंडकाव्य लिहावं अशी कल्पना त्यांच्या मनी रुजली. नाथ माधवांच्या कादंबऱ्या वाचल्यानंतर कित्येक दिवसपर्यंत कागद पेन्सिल घेऊन ते आढ्याकडे डोळे लावून बसले होते.... वाऱ्यावर उडणारा तो कागद एकदा कुणाच्या हाती लागला त्यावर वळणदार टप्पोऱ्या अक्षरात लिहिलं होतं–

'सूर्य उगवला होता'

असे कितीतरी सूर्य आजपर्यंत उगवल्यावर जागच्या जागी मावळले होते. मध्यंतरी रशियन रॉकेटस्‌विषयी वाचून आपणही अद्भूत शोध लावून जगाला चकीत करून टाकावं असं त्यांना वाटू लागलं. परंतु असा शोध म्हणजे नेमकं काय याचा निर्णय बऱ्याच दिवसांच्या विचारान्तीही न लागल्यामुळे तो नाद सुटला. त्यानंतर कुणाच्यासं मागे लागून किमयेचेही प्रयोग करून पाहिले पण तांब्याच्या होणाऱ्या सोन्याऐवजी पैशांची माती होऊ लागली तेव्हा डोक्यांतलं सोनेरी वेड नाहीसं झालं. हल्ली त्यांच्या डोक्यातलं नवं वेड होतं "परलोक विद्येचं" !

मरणोत्तर माणसाच्या मुक्त झालेल्या आत्म्याशी सबंध जोडून त्यांच्या दुनियेची रहस्यं समजूत घेता आली तर...चंद्रलोकावर जाण्याची यातायात करण्यापेक्षा परलोकात सदेह संचार करता आला तर काय बहार येईल असे विचार मनात घोळू लागले.

आत्म्यांना प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष भेटून बोलता आलं तर. . . नवकाव्याबद्दल कालिदासाशी चर्चा करता येईल – अणुबॉंबबद्दल शिवाजी महाराजांचे विचार समजून घेता येतील, नाना फडणविसाबरोबर बुद्धिबळाचे दोन डाव खेळता

# गोठ्यात साहेब शिरलेला

रजनी कर्णिक

येतील—गडकरी मास्तरांकडून नाटकांची नवनवी कथानकं मागता येतील. ब्रह्मांडी प्राण नेऊन चराचराचं दर्शन करणाऱ्या द्रोणाचार्यांसारख्या महात्म्यांना टेलिव्हीजनची गंमत सांगता येईल—मंत्रास्त्रांची माहिती असलेल्या आत्म्याशी यंत्रास्त्रांची माहिती सांगून वादंग घालता येईल— गेल्या आठवड्यातच गणपति मंदिरात रात्री अकरापर्यंत त्यांनी बबनराव नाईक — प्रोप्रायटर वृंदावन हेअर कटिंग सलून, उस्ताद टेलर तुकाराम शिंपी, आणि सुवर्णकार बाळा सोनार प्रभृति भूतप्रेत-वाङ्मय विशारदांबरोबर याच विषयांवर सगळ्या गांवाला ऐकू येईल अशा स्वरात मोठी रंगतदार चर्चा केली होती.

याच विचारात रात्रीचे दोन वाजून गेले, तरी झोप त्यांचेजवळ फिरकतही नव्हती. घरात ते एकटेच होते. मास्तरीण-बाई, वंड्या आणि चिमूला घेऊन दोन दिवसाच्या करारानं माहेरी गेल्या होत्या जाताना त्यानी बजावलं होतं—

'घरात लक्ष असू द्या म्हटलं ! नाहीतर डोळे लावाल वर आणि वाहून जाईल घर—तरी दाद नाही लागायची'

रागावलेले मास्तर म्हणाले—

"तर तर— मी काय एवढा अगदी हा नाही, समजलीस ?"

आता हा संवाद आठवून झोपेतही मास्तर स्वतःशीच हंसले. 'वेडी बाईल कुठली ! अग दोन दोन वाजेपर्यंत जागत होतो घराची राखण करीत...' असं चिमूची शपथ घेऊन आता सांगता येईल तिला. मास्तरांनी भली मोठी जांभई दिली न् कुशीवर झाले.

घराबाहेर, म्हाताऱ्या रात्रीनं आकाशाच्या डबक्यातून काळोखाचा चिखल उपसून काढला होता. दारु पिऊन तर्र् झालेला वारा झोकांड्या खात अद्वातद्वा लडबडत पानापानातून आणि घराच्या कौलरावर ठेचाळत होता. घरातल्या भिंतीवरच्या वृद्धक घड्याळानं कुरकुरत अडीचचा टोला दिला आणि झोपेत पुटपुटावं तसं टक् टक् करू लागलं. मास्तरांच्या उशागती असलेला कंदील तर येडपटासारखा भक् भक् करीत स्वतःच्या थोबाडालाच काजळ फासत बसला होता.

इतक्यात गोठ्यातली म्हैस एकदोनदा रेकल्यामुळे मास्तरांना जाग आली...अपरात्री रेकायला काय झालं या वयाला ? चारा संपला नसेल ना ? मास्तरानी वात कमी करीत घड्याळाकडे नजर टाकली

पायात वहाणा सरकावीत कंदील न् काठी घेऊन दार उघडून ते अंगणात आले. वाऱ्याचा झोत अगांतुक पाहुण्यासारखा घरात घुसला. पुढच्या दाराला त्यानी सांखळी घातली. घराच्या डाव्या अंगाला मागील दारी पंचवीस तीस पावलांवर गोठा होता. मिणमिणता कंदील गोठ्याच्या दाराशी उंच केला — म्हशीच्या पुढ्यात बराच चारा होता. छोटी पाडीही दुसऱ्या कोपऱ्यात मजेत पडली होती. उजेड दिसल्याबरोबर छोटी चिरट्या आवाजात म्हशीकडे पाहून रेकली. जणु काही 'ए, आई ! हा बघ ग कोण बुवा आलाय् भलत्या वेळी ! 'असंच ती म्हणत होती. बाकी सबकुछ सलामत होतं. मास्तरांनी पुढे होऊन म्हशीला थोपटलं "वरडायला काय झालं सटवे !" असं पुटपुटत, कंदील खाली करीत वळले... आणि त्यांच्या कानांवर शब्द पडले —

'मधरातचा सलाम माझ्या पोरा !' मास्तर विचारे एवढे चपापले की कंदील त्यांच्या हातून गळलाच. ज्ञानेश्वरांच्या रेड्याप्रमाणे म्हैस बोलली की छोट्या पाडीला वाचा फुटली ? भीत भीत त्यानी वळून पाहिलं — पलीकडच्या कोपऱ्यातून आवाज आल्यासारखा वाटला — मनात लटपटून पण उसनं अवसान आणून ते थोडे पुढे सरकले—धुरकटलेल्या काचेतून निघणाऱ्या मिणमिण प्रकाशात त्यानी डोळे ताणले — भीतीऐवजी त्यांना आश्चर्यच वाटलं— कोपऱ्यात एक खरपूस म्हातारा साहेब बसला होता — गोरा गोरा पान— गोरेपण काहीसं विचित्र—संपूर्ण कोड असलेल्या माणसासारखं—डोक्यावर टॅक्सी ड्रायव्हर घालतात तसली टोपी घातली होती— त्या टोपीखालूनही दिसणारे केस, भुवया शिवाय हातावरचे केससुद्धा हस्तीदंती रंगासारखे पिवळट-पांढरे होते. अंगात फिक्कट निळसर रंगाचा सुती स्वेटर होता— काळसर रंगाची अगदी चिंचोळी न् बरीच तोकडी विजार घातली होती न कुणब्यासारखा गुडघे मोडून बसला होता. कंदिलाचा मिणमिण प्रकाशही त्याच्या पिचक्या डोळ्यांना सहन होत नव्हता. सारखे लवलव करीत होते त्याचे हिरवट रंगाचे डोळे ! अर्धवट आश्चर्यानं न् अर्धवट भीतीने मास्तरांनी विचारलं

"कोण. . .कोण. . . तुम्ही ?—"

साहेबाने वरती न पाहाता दाढीचे हस्तीदंती खुंट खाजवले व मिटकी मारल्यासारखा आवाज काढला न् घोगऱ्या आवाजात उद्गारला—

'लई दूरनं आलो रे माझ्या सोन्या ! तरास नाय देणार बरं तुला !' मास्तरांनी आश्चर्यानं विचारलं—"पण ...पण तुम्ही कोण ? नांव काय तुमचं ?"

'मी होय ?' साहेबानं गालातल्या गालात हसून पुन्हा मिटकी मारली. 'सांगतो. पण माझ्या राजा, तुझा तो दिवा









जरा दूर ठेव वरं ! चांदण्याशिवाय कुठलाच प्रकाश सहन होत नाही रे आम्हा लोकाना–'

मास्तरांनी कंदील मागे सरकवला.

'हे बघ ! माझं नांव विलियम डंकन. चमकू नकोस. अस्सल इंग्लिश आहे मी लिव्हरपूरचा रहाणारा.'

'म्हणजे ? लिव्हरपूरहून. . .इतक्या अंतरावरून आलात. . . .तुम्ही ?' मास्तरांच्या आश्चर्याला पारावार उरला नाही. आपण झोपेत तर नाही ? त्यानी स्वतःला चिमटा काढला न् खात्री केली. 'आणि असे अनवाणी कसे काय आलात?'

'लई चवकस वरं का तू सोन्या ! वरं वरं, बस खाली. सगळं सांगतो तुला.'

नाईलाजाने मास्तर खाली बसले, काठीलाही जवळ ठेवली. जिवाचा कान करून मास्तर ऐकू लागले. म्हैस रवंथ करीत होती तेवढाच आवाज होत होता–त्याही आवाजानं मास्तरांना बरं वाटत होतं.

"हे बघ पोरा !" चघळल्यासारखं करून वुढ्ढा साहेब सांगू लागला 'माझा धंदा कोळचाचा. मासेमार आम्ही. आजखाली दोन वर्षांपूर्वी आमची होडी दर्याई तुफानात सांपडली. धडगत नाही असं वाटलं. मग मी बूट काढून टाकले. तसा मी चांगला पोहोणारा–पण होणाऱ्या गोष्टीपुढे कुणाचं चाललंय् ? शेवटी होडी उलटलीच. . . आन् गेलो रसातळाला–माझं शरीर माशांनी फाडून फाडून खाल्लं. . . . .'

'म–म. . म्हणजे. . त. . त तुम्ही . . . .' मास्तर बसल्या जागीच लटपटू लागले. उठण्यासाठी धडपडू लागले.

'अरे भिऊ नको रे सोन्या. . जॉर्जची शपथ. . . तुला तरास नाय देणार. .'

पण मास्तराना आता घाम फुटला होता. त्यानी रामरक्षा आठवण्याचा प्रयत्न केला. पण धड एक शब्द देखील आठवेना. थोडं थोडं मागे सरकून त्यानी कंदील गाठला न् ते लगबगीने उठले. धूम ठोकायची ठरवून !

"थांब रे पोरा ! काय सांगतो मी–शीट डोन !" डंकन साहेब गरजला. तशी ते पुन्हा मटकन् खाली बसले. हिंवताप भरल्यासारखे मास्तर लटपटत होते.

'सॉरी हं !' साहेब जरा नरमून म्हणाला 'अरे गुलम्या, शंभर वर्षं राज्य केलं ना आम्ही तुमच्यावर ? आदत पडून गेली बघ. बस तू, तरास नाय देणार.'

मास्तरांच्या मानेवरून पाठीपर्यंत एक गार रेटा सापोळीसारखा उतरला न् त्यांचं सर्वांग शहारलं. काही पिशाच्च फार प्रेमळ न् निरुपद्रवी असतात असं ऐकलं होतं त्यांनी. शंकेचे एकदोन घुटके त्यांनी गिळले.

'त्याचं असं झालं–' डंकन सांगू लागला–'आमची सूक्ष्म शरीरं वायूपेक्षाही हलकी. म्हणून सोसाटयाचा वारा सुटला की आमची त्रेधा उडते. मग आम्ही एकाद्या झाडावर किंवा वावर नसलेल्या मकानात आसरा घेतो. जोराचा वारा सुटला म्हणजे झाडाला बिलगून रहाता येतं. थेम्स नदीवर पूल आहे ना मोठ्ठा – त्याच्या खालच्या कमानीत रहात होतो मी–एकदा फिरायला निघालो– भयंकर वारा सुटला– अगदी झंझावात आन् पोरा–पाचोळा उडतो ना–तस्सा उडालो. जॉर्जची शपथ तीन रात्री आनी दोन दिवसपर्यंत उडत होतो. खाली डोस्कं वर पाय असा एका शेतात आदळलो शेवटी. कुठं ठाऊक आहे ? दलाई लामाच्या तिबेटात ! तेव्हापासून गेले तीन महिने सारखा भटकतोय. म्हटलं आल्यासारखा तुमचा देश तरी पाहून जाऊ. मघा वारं सुटलं होतं ना ? म्हणून घुसलो या गोठयात–पुन्हा ते खाली डोकं वर पाय नको–'

साहेबानं खुशीत येऊन बऱ्याच मिटक्या मारल्या. आता मास्तराना बराच धीर आला होता. ते सारखे डंकनसाहेबाच्या पायांकडे पहात होते. शेवटी धीर करून त्यानी विचारलं–

'पण काही साहेब, तुमचे तर पाय उलटे नाही दिसत. . . भुतांचे पाय. . . . '

त्याना बोलू न देता दोन्ही हातांच्या मुठी वर करून घुश्शात म्हातारा खेकसला –

'ओऽऽऽय्यू !! मूर्ख पोरगा कुठला ? भूत म्हणून माझा अपमान नको करू. भिऊ नको. कध्धी तरास नाय देणार तुला. पण लक्षात ठेव मी एक जीवात्मा आहे. इंग्लिश जीवात्म्याला भूत म्हणणं म्हणजे अस्सल इंग्रजाला बाबू म्हणणं समजलास ? इंग्लंडात भूत बाटलीत कोंबण्यापुरतंही मिळायचं नाही. तुमच्या माणसाच्या समाजात श्रीमंत, मध्यम आणि गरीब असे वर्ग आहेत ना ? तसे आमच्या समाजात सुद्धा आहेत. जीवात्मे, पिशाच्च आणि भूत. जीवात्मे म्हणजेच स्पिरिट्स. अगदी मवाळ. कध्धी तरास नाय देणार. उपकारच करतील. दुसरी घोस्टस् म्हणजे पिशाच्च. खूप जहाल. त्यांची खोडी काढली तरच ही मागे लागतील. तिसऱ्या वर्गात येतात भूतं. अगदीच उद्यामवादी. सापडतात फक्त हिंदुस्थानात. फार आगाऊ जात ही. उगाच कुणाच्या मानगुटीला बसतील, कोंबडं मागतील, दारु मागतील. इंग्लिश जीवात्मे किंवा पिशाच्च कधी कुणाच्या वाटचाला जायचे नाही. अरे, आम्ही इंग्लिश लोक मेल्यानंतर पण आमची डिसिप्लीन आणि सभ्यपणा सोडत नाही. हुल्लडबाजी फक्त हिंदु भुतांची. उलटे पाय त्यांचे ! इंग्लंडात कधी कुणाच्या अंगात आलेलं पाहिले आहेस कीं ऐकलं आहेस काय ? उलटचा पावलांचं पिशाच्च तिकीट लावून पहायला नाही मिळायचं. कां म्हणून नाही विचारलंस ? जन्मभर ज्यांच्या बोलण्या–चालण्यात मेळ नसतो अशा दांभिक वृत्तीच्या माणसाना मेल्यावर उलटे पाय लाभतात. आमच्याकडे तर म्हणच आहे–बोले तैसा चाले त्याची सुरफाटी पाऊले–

'देवबाप्पा !' मास्तर उद्गारले–'तुमच्याकडे म्हणी सुद्धा आहेत ?'










'हात्तीच्या ! कितीऽऽतरी. . . सांगू ? ऐक.'

'पिशाच्चाच्या पोराला काळोखाचं काय भय ?' 'कापूस तसं सूत माणूस तसं भूत' 'एक नूर भूत दस नूर भुताकटी' 'प्रेत गाडलं तरी पिशाच्च रहातं' 'उनाड पोरांना शिकवतो ना ? वावारे, 'भुताटकी शिक नाहीतर मागशील भीक' कारण जीवात्मे काय न् पिशाच्च काय भुताटकीची विद्या सर्वांना सक्तीची.

आपल्यावरोवर डायरी असती तर किती बरं झालं असतं असं मास्तरांना वाटू लागलं होतं. त्यांनी म्हटलं–

'कां हो, म्हणी आहेत मग काव्य असेल, लेखक असतील, तुमचं वाङमय असेल ?'

'सर्वऽऽ काही आहे' गंभीर मुद्रेने म्हातारा उद्‌गारला. 'पुस्तकं नाहीत हां मात्र. सर्व पुराणकालासारखं तोंडातोंडी. आपल्याला बाबा त्यातलं फारसं कळत नाही; कारण आम्ही कोळी ना ? मासेमारी करायची ठाऊक. पण आठवतात काही नमुने तेवढे सांगतो. एक करुण रसातली कविता ऐक. एका हडळीचं वात्रट कारटं गेलं चाळे करायला न् सांपडलं कुणाच्या तरी तडाख्यात. त्याला कोंबलं बाटलीत इतर भूतं आरडत ओरडत आली तेव्हा ती झिज्या मोकळया सोडून विलाप करते–

'हे कोण वोंबलले वोला ! बाटलीत वू सांपडला ।'

'काय सांगता काय ? रंगोबा मास्तर आता चांगलेच रंगले पण हे वू म्हणजे काय हो ?'

'वू म्हणजे भूताच्या भाषेतल्या त्या पोराचं नांव.'

'देववाप्पा ! आणि शृंगार रसातही कविता आहेत कां हो ?'

'अं. . . आहेत ना ! नुकतीच ऐकली होती. रुसून मसणात जाऊन बसलेल्या प्रियकराच्या आठवणीनं व्याकूळ होऊन एक सौभाग्यकांक्षिणी जाखिणी किंचाळून विचारते–

'येशिल कधि परतून ! खविसा येशील कधी परतून ! वरीच लांबलचक आहे. एवढीच आठवते.'

'अहो पण थोडेसे शब्द बदलून आमच्या मूळ कवितेचं केलेलं विडंवन आहे हे ! चक्क नक्कल आहे ही.'

'अरे वाबा, तुम्ही माणसं काय न् तुमची पिशाच्च काय ? एकजात पहिल्या नंवरचे नकले तुम्ही–'

म्हाताऱ्याच्या स्वरात हेटाळणीचा सूर होता.

'आजपर्यंत आमची नक्कल केलीत. आपली सोन्यासारखी जुनी न् भव्य संस्कृति सोडलीत. आमचे आचार विचार बळंवळं घेतलेत. गाढवानं वाघाचं कातडं ओढलं म्हणून त्याचा वाघ बनेल का ? साहेबाचा पोशाख न् भाषा सहीसही उचललीत पण त्याची नीतीमत्ता, साहेबाची दानत, त्याचा दिलदारपणा, न्यायप्रियता, स्वाभिमान, स्वच्छतेची आवड, नाविन्यप्रियता, जवावदारीची भावना, साहसप्रियता वगैरे कितीतरी त्याच्या















### नटी

एक होती नटी
नवऱ्याशी केल्या
तिने वाटाघाटी
शेवटी ठरलं –
'जेवायचं मी अन्–
विसळायची मात्र–
तुम्ही ताट-वाटी !'

### सरडा

एक होता सरडा
त्याचा रंग करडा
पण त्याने फिरविला बेत
राहू लागला पांढरा स्फेत !

### लाट

एक होती लाट
तिचा मोठा थाट
खडकावर आदळून मात्र
ती झाली सपाट !

### व्याही–प्रेम

दोन भेटली गाढवं–
म्हणाली, आहोत आपण दोघं व्याही-
–त्यांचं ते प्रेम पाहून–
–उकिरडा म्हणाला– 'त्राही'!!

### मिरची

एक होती मिरची
ती भारीच तिखट
तिला बघून चिंचेने
तोंड केलं आंबट !!

—अशोक का. जोशी

व्यक्तित्वातले पैलू तुम्हाला पाडताच आले नाहीत. थोडक्यात काय तर स्टेजवर काम करणाऱ्या राजासारखी उमनी ऐट आणली तरी पडद्यामागे काडयाची पेटी न् विडी कुणाजवळ तरी मागणारच तो. हा ऽऽ हा ऽऽ !'

आपण फार मोठ्ठा विनोद केला असं वाटून डंकन साहेबानं दोन तीन फर्स्ट क्लास मिटक्या मारल्या—

'रागावू नकोस हं, पोरा ! आणि कृतघ्न रे तसेच तुम्ही ! इंग्रजी काढा, काढा म्हणून केवढी बोंबाबोंब चालवली आहे रे ? अरे, ज्या भाषेनं तुम्हाला लहानाचं मोठं केलं, वाढवलं, अंधारातून उजेडात आणलं त्या भाषेला धक्के मारून काढण्यासाठी केवढं आकांडतांडव ! आईला पाहिल्याबरोबर दाईला लाथाबुक्या मारणारा द्वाड कारटा—आणि तुम्ही सारखेच! टिंगलसुद्धा अशीच की रे करता—आम्ही टबात आंघोळ करतो म्हणून नाकं मुरडता न् तुम्ही आंग धुताना धड कपडे सुद्धा काढत नाही. छोटा दोन लोटे खांद्यावरून ओतले की झाली तुमची आंघोळ! दात घासायचे तेही बाहेर ओटयावर येऊन. घशातून आवाज काढायचे—घशात बोटं घालायची ती डोळे पांढरे होईपर्यंत ही काय रीत? जगायची नाही तशी मरायची पण अक्कल नाही तुम्हाला. सासू—सुनेचं भांडण झालं की ती अंगावर रॉकेल ओतून घेते. नाहीतर विहीरीत बुडून बेडकीसारखं फुगून वर यायचं न् दुसऱ्याला किळस आणायची. मेल्यानंतर आपला देह किती भयंकर व घृणास्पद दिसेल याची जाणीवच नाही. इंग्रज एवढया तेवढयासाठी मरायचाच नाही. इंग्रजी नारीनं जीव दिला तरी ती झोपेच्या गोळया खाईल, गॅसचा उपयोग करील नाहीतर रिव्हॉल्व्हर उडवील. मेल्यावरही सुंदर दिसावं असं वाटतं तिला. मेलेल्या माणसांला फार मान देतात. काशीच्या घाटावर दोरड्यानी आवळलेले, आडवे तिडवे मुडदे पाहिले न् पळालो रे मी सोन्या. बघवेना अगदी ! . . . '

साहेबाची गाडी भलत्याच रुळावर चालली होती असं मास्तरांना वाटू लागलं. त्यांना हवी होती परलोकची माहिती. त्यानी सांधा बदलायचा ठरविला.

'कां हो डंकन साहेब, तीन महिन्यात फार झक्क मराठी बोलू लागलात तुम्ही.'

'साफ चूक वेटा ! अरे, आम्हाला कुठलीच भाषा शिकावी लागत नाही. माणसाशी बोलायचे प्रसंग फार क्वचित् पण त्यावेळी समोरच्याची भाषा आमची भाषा होते. आता मी इंग्रजीत विचार करतोय पण शब्द मात्र उमटताहेत मराठीत; कारण सूक्ष्म शरीराला भाषेचं बंधन नसतं. जॉर्जची शपथ ! अरे, नाहीतर भुताटकीची विद्या शिकविताना कुठल्या भाषेचं माध्यम ठेवायचं याबाबत मजाच झाली असती. निदान हिंदुस्थानातल्या भुतांची तरी हुल्लडबाजी माजवली असती. वेताळसाहेब गांजून गेला असता अगदी—'

'वेताळसाहेब?' आश्चर्याने मास्तरांच्या भुवया वर गेल्या.

'लई उमदा अंमलदार. सहा महिन्यांचा व्हिसा दिला मला हंसत त्यानं. तुमच्या देशातल्या सगळ्या परलोकवाल्यांचे 'चीफ' ते !'

'देवबाप्पा ! आणखी कोण भेटले हो तुम्हाला ? कालिदास भेटला का ? तो शाकुन्तलवाला ?'

'अरे राजा, कुठला कालिदास न् कुठलं शाकुंतल ? बरे ऽऽच भेटले पण इन्ट्रोडक्शन नाय दिली करून कुणी म्हणून बोललोच नाही. इंग्लंडात मात्र अब्राम लिंकननं खांद्यावर हात ठेवून चौकशी केली. एकदा दिसला वास्को-ड-गामा.स्वारी होती आपल्याच मिजाशीत ! मग मीपण नाही बोललो— डुक्कर कुठला ! अरे सोन्या—व्यक्ति तितक्या प्रकृति !'

'आणि खाण्यापिण्याचं कसं काय हो?' मास्तरांनी पत्रकारासारखा प्रश्न टाकला. डंकनसाहेबांच्या डोळ्यांच्या फटी उघडल्या न् त्यांचे हिरवे डोळे अंधारातही विजेसारखे लकाकले. बरेच दिवस उपाशी असावा तो!

'खाण्याचा प्रश्नच नसतो रे सोन्या— सापासारखे वर्ष वर्ष हवा खाऊनच रहातो. वासना गेलीच तर तुमच्यातला कुणी दिलं कीं घ्यायचं कोंबडं न् दारु फार रे आवडते. म्हणच आहे आमची 'खायला कोंबडी

न् पियाला ब्रँडी' साहेबाच्या तोंडाला पाणी सुटलं असावं.

'आम्ही इंग्रज मागायचे नाही कुणाकडे. पण तुझी माझी बरीच दोस्ती झाली आता.' मग ओठांवरून जीभ फिरवून साहेबाने हळूच विचारले–

'आहे का रे थोडीशी ब्रँडी घरात ?'

'छे: छे: अहो दारुबंदी आहे नां इथं. ब्रँडी काय देशी सुद्धा मिळणं कठीण.'

'छया छया – देशी नको. एकदा पावसाचा एका झोपडीत शिरलो न् हातभट्टीनं रात्रभर मळमळलं. चांगला बिमार पडलो. एका पिंपळाखाली रहात होती हडळी. तिनं शुश्रुषा केली म्हणून वांचलो नाहीतर. . .'

'म्हणजे ? पिशाच्च देखील मरतात का ?' आश्चर्याने मास्तरांनी विचारलं.

'अं. . अं. . मरतात म्हणजे पाण्यातल्या चिखलासारखे हवेत विरतात. पुन्हा साकार व्हायला फार कष्ट पडतात. . .'

'तुमचं अदृश्य होण्याचं नि साकार होण्याचं काय कसब आहे हो ?'

'फार खोलात शिरू लागलास रे सोन्या–हे बघ, आमची रहस्यं सांगायची नसतात पण मी परदेशी. तुमची आमची नियमांची यादी वेगळीच असते, म्हणून सांगतो. त्याच्या ठराविक मुद्रा आहेत. दृश्य होण्याची मुद्रा निराळी न् अदृश्य होण्याची वेगळी. कोंबडा आरवला कीं मात्र ढुंगणाला पाय लावून पळावं लागतं आम्हाला'.

आता साहेब थोडा अस्वस्थ झाल्यासारखा वाटत होता. कसला तरी मागोवा घ्यावा तसं करीत होता. मास्तरांची उत्सुकता मात्र वाढली होती. अजून बऱ्याच गोष्टी त्यांना त्याला विचारावयाच्या होत्या. बबन, बाळा नि तुकारामाला चाट करणार होते साहेबाची गोष्ट सांगून.

'कोंबडं आरवायला अजून अवकाश आहे साहेब.' पण साहेबांचं लक्ष मास्तरांच्या बोलण्याकडे नव्हतं.

'आं, काय म्हणालास सोन्या ?' दचकून चुळबूळ करीत साहेबानं विचारलं.

'मी असं म्हणालो, उजाडायला वेळ आहे बराच. पण कां हो डंकनसाहेब, आमच्या इथल्या परलोकावर जशी वेताळसाहेबांची सत्ता आहे तशी तुमच्याकडे कुणाची आहे ?'

'आं – आंऽ? काय म्हणालास ? आमच्या इथं नां ?. . आं. . आं. . आमच्या इथं. . . .'

इतक्यात बाहेरच्या बाजूला कुणीतरी तोंडात बोटं घालून शीळ द्यावी तसा आवाज आला. त्यासरशी साहेब घाईघाईनं उठला. मास्तर काही बोलण्यापूर्वीच त्यानं गोठ्याचं दार गाठलं होतं. त्याला तुरु तुरु चालताना पाहून मास्तरांना कमालीचं आश्चर्य वाटलं. बराच चपळ होता की म्हातारा. आणि वाऱ्यापेक्षा हलकाही. काही दिसत नव्हता.... कारण वाटेतली काडी मोडली त्याच्या पायाखाली.

'अहो डंकनसाहेब. थांबा ना जरा– कुणीतरी शिट्टी मारली ती – कोंबडा नव्हता काही. . .थांबा ना साहेब – तुमची ती मुद्रा....'

क्षणमात्र गोठ्याच्या दारात घोटाळला साहेब न् दुसऱ्याच क्षणी गालातल्या गालात हंसत तुरु तुरु चालत पसार झाला.

मास्तर नुसते पहात राहिले. त्यांचं डोकं सुन्न झालं. काय बरं हा प्रकार सारा ? स्वप्न तर नव्हे ? त्यांचा हा भ्रम फार वेळ टिकला नाही. जवळच म्हैस फळफळली आणि त्याचे बरेच थेंब त्यांच्या अंगावर आले तेव्हा ते भानावर आले. बाहेरच्या बाजूला पळत गेल्याची बरीचशी पावलं वाजली. मास्तर ताडकन् उठले. त्यांचे हातपाय थोडे लटपटत होते. कंदील घेऊन ते बाहेर आले.

बाहेर उषादेवीच्या स्वागताची जोराने तयारी चालली होती. काळोखाच्या मंडपाला कुणीतरी हळुवार हातानं फिक्कट पांढरी सफेती दिली होती. गार वाऱ्याच्या मंद मंद झुळुकीची तोरणं अधुन-मधून सळसळत होती. मधूनच चिमुकला चोपदार पंख फडकावीत चित्कारत होता– 'बाअदब्, हुश्शार !'

रंगोबा मास्तरांना यापैकी एकही गोष्ट मनाला स्पर्शून जात नव्हती. शून्य-विमनस्क स्थितीत ते बसले होते. एकाएकी त्यांना आठवलं. भुरट्या चोरानी गेल्या महिन्यापासून आजुबाजूच्या गांवांतून डल्ले मारले होते. म्हणजे डंकनसाहेब सुद्धा–धुरकटून गेलेल्या कंदीलाची वात उगीचच त्यांनी वर केली. घराला वळसा घेऊन ते अंगणात आले आणि त्यांच्या छातीत फाळ पडला.

त्यानी लावलेलं दार सताड उघडं होतं. घरातल्या सगळ्या गोष्टी अस्ताव्यस्त पडल्या होत्या. कपाट मोकळं केलं होतं. पेट्या उपसल्या होत्या. चांदीची भांडी, दागिने, रोकड मिळून सातशे-आठशेचा ऐवज चोरट्यानीं लांबवला होता. बायकोनं जाताना केलेले बेसनाचे लाडूसुद्धा मेल्यानी खाऊन फस्त केले.

दोन्ही हातांनी डोकं धरून ते थोडा वेळ बसून राहिले. आता बाईल आली म्हणजे काय म्हणेल ? एकाएकी त्यांच्या अंगी चैतन्याचा संचार झाला. अजूनही काहीतरी करता येईल. अजूनही ! धांवत ते अंगणात आले.

अजून पहिला कोंबडा आरवला नव्हता. तो मान आज रंगोबा मास्तरानी पटकावण्याचे ठरविले. पहाटेच्या त्या प्रशांत वातावरणात कोंबड्यापेक्षाही उंच मान करून बेंबीच्या देठापासून ते बोभाटले –

'धांवा – धांवा ! चोर ! चोर !!'

●●●



"बरं का, दत्तूला छत्री घेऊन पाठव, तोपर्यंत मी अशीच बोलत रहाते."





# नाच हृदया आनंदे...





**- सौ. चित्रा वडगांवकर**

**सौंदर्यवर्धक** अशा ज्या पांच ललित-कला, त्यातील एक मनोहारी कला म्हणजे नृत्यकला ! मानवाची जी क्रीडा प्रवृत्ति ( Surplus energy) तीतूनच नृत्य उद्‌भवलेले ! नृत्य म्हणजे मानवाच्या उत्साहाचे मूर्त स्वरूप ! ह्या दृष्टिकोनातून पाहिले तर 'नृत्य' 'नृत्य' असे म्हणतात ते काय, तर एक "सौंदर्यपूर्ण हालचाल !" सारी मानव जात कळत न कळत सौंदर्या-साठी तृषित झालेली असते. त्यामुळेच कुठ-ल्याहि ललितकलेचा सौंदर्य हा एक अवि-भाज्य घटक असतो. अर्थात् म्हणूनच प्रत्येक हालचाल ही नृत्य होऊ शकत नाही. तर केवळ सौंदर्ययुक्त हालचल हीच नृत्य ही संज्ञा घेऊ शकते.

शान्त, नीरव वनराजीपेक्षा वाऱ्याने मंद मंद डोलणारी वृक्षराजी जास्त चेतोहर वाटते नाही का ? निर्जीव, चेतनाहीन पडलेली तृणराजी ! कुठून तरी खोडकर झुळूक येते, नि त्या निर्जीव तृणराजीचे मंजुळ गुज सुरू होते; नि मग कुणा तरी रसिक कबीर पुत्राला वाटू लागते, ही चिमुकली तृणे मानेने आपल्या अंतरीचे हितगुज तर सांगत नसतील ना ? शान्त, स्तब्ध जलाशयात समीर मन्दमधुर तरंगावली निर्माण करतो, नि किनाऱ्या-वर बसून ती अवलोकिणारा वेडावलेला रसिक म्हणतो, ही पाठशिवणी तर नव्हे ना ? ती सारी सौंदर्याने विनटलेली हाल-चालच मानवाला सौंदर्याची जाग देत होती. त्याचा प्रभाव दाखवत होती. नि मग सौंदर्यलुब्ध झालेला मानव न कळत—उत्स्फूर्ततेने आपल्या शरीराची हालचाल करू पहात होता. त्यात सौंद-र्याचा मादक वहर निर्माण करीत होता. त्यात चैतन्याचा वर्षाव करत होता. न कळत आपल्या सुंदर बाहूंना तो चिमु-कल्या तरंगाची हालचाल देत होता, तर आपले मस्तक वायूने झुलणाऱ्या पल्लवा-सारखे लववित होता. आणि मग हीच त्याची हालचाल सौंदर्यपूर्ण करण्याची तीव्र आंस, एक दिवस रूप घेणार होती; नृत्य ह्या नांवाने !

हालचालींतील लावण्य जसं मनाला चटका लावतं, तसंच मानवी मनाला मनस्वी वेड लावते ती गतिमानता ! वेग ! चापल्य ! मानवाने एक दिवस पाहिले ते अवखळ नि अचपळ हरिण शावक ! त्याच्या चापल्याने माणसाचे मन कसे भुलून गेले. त्याचं चापल्य आपल्या अंगी उतरविण्याचा तो प्रयत्न करू लागला. वर्षाकाली तांडव करणारा तो प्रभंजन वायु ! नि त्यात नर्तन करणारी ती स्वर्गीची बाला ! तिचे ते स्वतःभोवती गिरक्या घेणारे चापल्य ! ह्या साऱ्यातील गतिमानता त्याला मुग्ध करीत होती.

सारे आदिमानव खऱ्याखुऱ्या अर्थाने निसर्गाची लेकरेच होती. ती निसर्गाच्या कुशीतच जन्म घेत, नि त्याच्या संगतीतच हंसत बागडत जीवन जगत ! निसर्गाचे प्रमुदित वासंतिक रूप त्याला मुदित करी, तर प्रलय प्रभंजन त्याला भयकंपित करे. निष्पर्ण शिशिर त्याला अनामिक आर्त पिसे लावी. त्याच्या हर्षाचा, शोकाचा निर्माता जणु निसर्गच होता. नि त्याच्या नित्य नव्या स्वरुपाने स्तिमित झालेल्या मानवाने, त्याची पूजा बांधिली ! रोज प्राचीच्या रंगमंचावर नृत्य करणारी चिर-यौवना, रुपगर्विता उषा; आपले 'ऋतु'





अनुक्रमणिका

**मानवाने एक दिवस अवखळ, चपळ हरिण शावक पाहिले. त्या चापल्याने तो हरखला, भुलला. ते अंगी बाणविण्याचा त्याचा प्रयत्न सुरू झाला. पक्ष्यांनी स्वर शिकविले तर हरिणाने डौलदार गतीचे धडे दिले....**

घेऊन येणारा जीवनदाता वरुण; प्रलयकाली भीषण तांडव करणारा 'मरुत्' नि नित्य नवे जीवन देणारा सविता ही सारी त्याची पूजनीय दैवते बनली. तो त्यांना स्तवू लागला नि मंगलाची याचना करू लागला.

## देवता तसेच ज्ञानदाता निसर्ग

एका अंगाने मानव निसर्गाला 'देवता' मानून पूजन करू लागला तर दुसऱ्या बाजूने त्याच निसर्गाला तो 'गुरु' मानून त्याचे अनुकरण करू लागला. वायुसंगे हिंदोलणाऱ्या लतेसारखा लवलवू लागला, तर सागरांच्या लाटांसारखा डोलू लागला. कधी नवरंगी, नटरंगी मयूराच्या अभिजात गतीच्या डौलाचे तो अनुकरण करू लागला, तर कधी वनराजाची नृपसमान रुबाबदार गती त्याला विलोभनीय वाटू लागली. पंचमात सुरेल निनाद करणाऱ्या कोकिळेचा स्वर तो प्रतिध्वनित करू लागला. तर कधी मेघगर्जनेचा ध्वनि काढू लागला. आणि ह्याच आदिमानवाच्या निसर्गानुकरणातून आपल्याला लाभलेली दैवी देणगी म्हणजे गायन व नृत्य ह्यासारख्या ललितकला !

हालचाल नुसती सौंदर्यवाहिनीच असते असे नव्हे तर ती तीव्र मनोभावनांचे आविष्करण करण्याइतकी सामर्थ्यशालिनीहि असते. भावनांच्या आवेगाच्या क्षणी शरीर कसे उत्स्फूर्त हालचाल करू पहाते. उत्कट आनंदाच्या, दुःखाच्या अगर संतापाच्या क्षणी शरीर कसे न कळत झटपट हालचाल करू पहात असते.

फार फार पूर्वी आपले मनोगत शब्दात पकडण्यापूर्वी, मानव ते हालचालीतून व्यक्त करू पहात होता. चिमुकलं गोजिरवाणं बालक ! आपल्या हातपायांची कशी गोंडस हालचाल करून आपला आनंद मुखरित करू पहाते. भाषाशास्त्र तर त्याच्यापासून फार दूर असते. गायीचं छोटेसे वछडं देखील कसं स्वच्छंदपणे उडया मारून, आपली आई दिसल्याचा आनंद दर्शवित असतं ! त्यांच्याप्रमाणेच भाषाशास्त्राचे किचकट नि कठीण माध्यम निर्माण करण्यापूर्वी मानव आपल्या तीव्र मनोव्यापारांचे आविष्करण अशा हालचालीच्या माध्यमातून करीत होता. ह्या अशा उत्कट भावनांच्या आंदोलन क्षणी निर्माण झालेल्या उत्स्फूर्त हालचालींना, मानव अनुकरणाने नि संयोगाने (association) पद्धतशीर स्वरूप देऊ पहात होता. नि त्यातून तयार होत होती ही नयनरम्य नृत्यकला.

## हालचालीतून झालेला आविष्कार

अशा ह्या आदिमानवाच्या मनोभाव व्यक्त करण्याच्या आंसेतून, नि त्याच्या सौंदर्यासक्तीतून, मूर्त शब्दवेद प्रगट होण्यापूर्वी निर्माण झाले ते हे नृत्य ! निसर्गाचा हा चलाख शिष्य मानव दिवसेंदिवस परिणतप्रज्ञ होत होता. आपल्या ह्या स्वाभाविक चलनवलनांस आपल्या कल्पकतेची, बुद्धिमत्तेची जोड देत होता. हळू हळू त्याला संकेत, कृत्रिमता हे बन्ध निर्माण होत होते. नि त्यातून समूर्त होत होती ती ही प्रियदर्शनी मनोहारिणी नृत्यकला !

## नृत्यकलेसंबंधी मूलभूत विचार

आपल्या आधुनिक नवज्ञानाचा गर्व वाहता वाहता, आपण नकळत त्या नवज्ञानाच्या एका ठराविक चाकोरीतून जाऊ लागतो. आधुनिकतेच्या ध्वजाखाली हल्ली ललितकलांची अभिरुचि येत असल्याने बरेच आधुनिक रसिकजन गायन-नृत्यादि कलांकडे आकर्षित होऊ लागले आहेत. परन्तु अलिकडील नृत्यावरील सर्व लिखाणाचा साकल्याने विचार केला **तर एकच एक ठराविक सांचा दिसतो.** तीच तीच सांचेबन्द चार नृत्यपरम्परेवरील (कथाकली, कथ्थक, भरतनाटचम् व मणीपूरी) ढोबळ पण लालित्यपूर्ण माहिती, आलंकारिक नि आरसपानी शैली, नयनरम्य नि कलात्मक रेखाचित्रे हेच फार तर त्याचे ठराविक वैशिष्टच म्हणता येईल.

विषयाच्या प्रत्यक्ष ज्ञानाचा अभाव हे कारण वरील दोषांचे असू शकेल. अर्थात् त्यालाहि काही अपवाद असू शकतात. पण ते नियम सिद्ध करण्यापुरतेच ! नर्तक ह्या पेशाला सामाजिक प्रतिष्ठा न लाभल्याने, नर्तक क्वचित्च सुशिक्षित नि सुसंस्कारित असतात. त्यामुळे आपल्या प्रात्यक्षिक ज्ञानाच्या जोडीला ते नवीन साहित्यिक मूल्ये, नवी समीक्षा दृष्टि किंवा मानसशास्त्रीय पार्श्वभूमि व ऐतिहासिक कठोर निकष क्वचित्च लावू शकतात. जे सुशिक्षित टीकाकार व रसिक असतात, त्यांना विषयाचे प्रत्यक्ष ज्ञान नसल्याने, त्यांचे







अनुक्रमणिका

विवेचन एकांगी असते. ज्या एका थोर कलावन्ताच्या किंवा नर्तकाच्या सहवासात ते येतात त्याच्या तेजोवलयाने ते भारावून गेलेले असतात.

अशा पुस्तकांचा सांचा बव्हंशी ठराविक असतो. पुस्तकातील पहिले विवेचन 'नृत्याचा प्रारंभ' ह्याविषयी.नंतर शास्त्रोक्त नृत्याच्या चार प्रमुख परंपरांची ठराविक माहिती व तद्नंतर काही कलावन्तांचा परिचय. आज आपण अर्थातच – नृत्याचा प्रारम्भ– ह्या विषयापुरतेच आपले विवेचन मर्यादित करू या ! ह्या विषयात क्वचित्च लेखक आपली अस्मिता दाखवितात. तोच तोच पौराणिक अर्थवादीय प्रारम्भ देतात– 'शिवाने नृत्य प्रारम्भिले' 'पार्वतीने लास्य-नृत्य सुरू केले' 'तिने उषेस शिकविले' किंवा 'कालीने नृत्य निर्मिले' 'तण्ड्वस शिवाने नृत्य शिकविले'. . इत्यादि. .

ही केवळ अर्थवादीय गौरवाची उदाहरणे नाहीत का ? अर्थात् वर्ण्य विषयांस धार्मिक पार्श्वभूमि देण्यात पूर्वसूरींचा एक मोठा उदात्त हेतू असतो. तो म्हणजे विवेचनास गौरवास्पद स्थान देणे. ह्या पौराणिक पार्श्वभूमीविषयी आदर बाळगूनहि आपण आधुनिक वास्तववादी निकषावर ती स्वीकारू शकत नाही.

परन्तु ही पौराणिक उपपत्ति वास्तववादी निकषावर जरी अर्थपूर्ण वाटत नसली तरी आपण तिच्यातील प्राचीनत्त्व, सूचकता, गौरव नि कल्पकता इत्यादि गुणविशेष अव्हेरू शकत नाही. उदा. शिव हा वीरश्रीयुक्त ताण्डव नृत्याचा उद्गाता नि नाजूक, लालित्यपूर्ण व लास्यपरिपूरित अंगाची निर्माति उमा दाखविण्यात किती सूचकता नि औचित्य आहे ! तद्वतच बंगाल वगैरे पूर्वेकडील प्रदेशाची उपास्य देवता जी काली हिचा नृत्यनिर्माति म्हणून समावेश करण्यात व बाणासुर कन्या उषा हिम गौरीच्या पट्टशिष्येचा मान देऊन तिच्याकरवी व्रजांगनाना नृत्य प्राप्त झाले असे म्हणण्यात प्राचीनांची सर्व संग्राहक वृत्तीच सुस्पष्ट होते.

त्याचप्रमाणे ब्रह्मदेवास नाटयवेदाचा जनक करण्यातहि ललित-कलाना गायन, वादन, नर्तन, नाटय इत्यादि – ह्याना सुप्रतिष्ठित करण्याचा हेतू नाही का ? उदा:–

**वाद्यं नाट्यं यथा गेयं चित्रं वादित्रमेव च।**
**वेदमंत्रार्थवचनैः समं ह्येतद् भविष्यति ।।**

(नाटयशास्त्र ३६–२१)

ह्यात ललितकलाना वेदमन्त्रांच्या पंक्तीत बसविण्याचाच प्रयत्न आढळतो. ब्रह्मदेवाने नाटयवेदांस साधनसामुग्री कोठून घेतली हे वर्णन करणारा पुढील श्लोकः—

**जग्राह पाठ्यमृग्वेदात् सामभ्यो गीतमेव च।**
**यजुर्वेदादभिनयान् रसान् अथर्वणादपि ।।**

हा श्लोक वाच्यार्थाने स्वीकारणे दुरापास्त वाटते पण त्यातील सूचकता किती मनोरम आहे नाही का? प्रत्येक वेदातील वैशिष्ट ध्वनित करून ते स्वीकारलेले आहे. ऋग्वेदातून पाठय घेतले कारण ऋग्वेद हेच आद्य शब्दरूप वाङमय ! सामवेद म्हणजे गानरुप ऋग्वेद ! अर्थात् त्यातून गान हे अंग घेण्यात आले. नाना कथांनी युक्त अशा अथर्ववेदात रस-निष्पत्ति असल्याने त्यातून रसांचे ग्रहण केले आहे. मोठा विलोभनीय फुलोरा आहे नाही हा सारा कल्पनांचा !

नाटयशास्त्राचा जनक 'भरत' व त्याचे 'नाटयशास्त्र' त्यांच्याभोवतीहि असेच पौराणिक कल्पकतेचे धूसर तेजोवलय निर्माण करण्यात आलेले आहे की त्यातून ऐतिहासिक सत्याचे कण शोधणे अशक्य-प्रायच होते. भरत नि तण्ड्व ह्या कुणी ऐतिहासिक व्यक्ति होत्या की पौराणिक कल्पना हेहि आपण निश्चित सांगू शकत नाही. भरत तर ही एक व्यक्ति होती की जमात हेहि निर्धाराने सांगता येत नाही.

एवंच हे पौराणिक संदर्भ कल्पक, सौंदर्ययुक्त असले तरी बुद्धीला समाधान देत नाही. मग असे वाटते की साऱ्या ललित-कलांच्या मुळाशी असलेली, स्वतःच्या मनोभावांचे आविष्करण करण्याची तीव्र तळमळ, आसक्ति हीच मूळ प्रेरणा असेल का नृत्यनिर्मितीच्या पाठीशी? प्रमाथी भावना मुखरित करण्याची तीव्र तळमळ, सौंदर्याची अमर्याद आसक्ति हीच खरी नृत्याच्या निर्मितीची प्रमुख प्रेरणा ! आणि मग ह्या दृष्टिकोनातून पाहू गेल्यास नवे साहित्यसमीक्षक वाङमयीन उपपत्ती-विषयी जे मत ग्राह्य धरतात तेच नृत्यालाही योग्य ठरते. ललितकला ही बुद्धिग्राह्य किंवा इंद्रियग्राह्य सौंदर्यप्रचिती घडवून मानवाला एका उच्च वातावरणात नेत असते.

आज कथ्थक, मणीपूरी भरतनाटयम् व कथाकली ह्या नृत्य परम्परांतील कलेकलेने परिणतावस्थेत गेलेल्या मुद्रा, आंगिक अभिनय पाहिला की तरी मनावर हेच प्रतिबिम्बित होते की ह्यांचे मूळ आहे आदिमानवाच्या उत्स्फूर्त हालचालीत नि निसर्गाच्या अनुकरणात ! कथाकलीतील 'सूर्य, सारथी, औषधी, सूर्यास्त, लता इत्यादि मुद्रा मानवाच्या सूक्ष्म निरीक्षण व अनुकरण ह्यांचाच पुनर्प्रत्यय देतात. विविध प्राण्यांच्या गति व स्वभावधर्म प्रतीत करण्याचे कौशल्य सर्व नृत्य परम्परांत दिसते. गज, हरिण, मयूर, अश्व इत्यादींचे अनुकरण फारच मार्मिकतेने केलेले आढळते. कथाकलीतील पक्षांची पंख साफ करण्याची कृति, हरिणाची सभोवार वळून पाहण्याची लकब, प्राण्यांची शरीर थरथरण्याची कृति इत्यादि साऱ्या क्रिया नि त्यांच्या प्रतिक्रिया ह्यातील सूक्ष्म निरीक्षण रसिकास खूष करते.

गतिमानतेची आपली आसक्ति कथ्थक-मध्ये प्रतीत होते. त्यातील द्रुतलयीतील तत्कारांवर प्रेक्षक अगदी बेहोष होतो. कथ्थकमधील राधाकृष्ण लीलात अगर कथाकलीतील भीम द्रौपदी प्रणय ह्यातील भाव, हालचाली इतक्या हुबेहूब असतात की त्या रसिकाला पुनर्प्रत्ययाचा आनंद देतात. कलावन्त तितका सामर्थ्यशाली तितके त्याचे निरीक्षण सूक्ष्म असते. उदा. कथाकलीतील चित्रांगदाचे वीणावादन. त्यात वीणावादकाचे इतके सूक्ष्म बारकावे दाखविलेले आहेत की प्रत्यक्ष वीणावादकच खूष व्हावा.

ह्या मानवी मनाच्या मूलभूत प्रवृत्तीवरच नृत्य उभारलेले आहे नि आधारलेले आहे. त्यावरच ते अधिकतर विकसित होत जाईल. ह्या आपल्या प्रवृत्तीना सुखविणारे नृत्य पाहून हर्षोत्फुल्ल मन बेहोष होऊन न कळत म्हणते "नाच हृदया आनंदें!" ●●●






White det

whitens while it washes clean

डेट

शुभ्र **डेट** ने कपडे स्वच्छ नि पांढरेशुभ्र निघतात

शुभ्र **डेट** च तुमचे कपडे स्वच्छ आणि पांढरेशुभ्र करू शकते. डेट ने तुमचे रंगीत कपडेहि निर्मळ नि स्वच्छ निघतात.

**स्वस्तिक** ऑईल मिल्स लि. मुंबई.

shilpi-som-28/67 mar





अनुक्रमणिका

# संस्कृत विनोद

--आनंद साधले



**शृंगार,** वीर आणि करुण हे तीन रस संस्कृत साहित्यात मोठीच प्रतिष्ठा पावलेले आहेत. हास्यरसाला मात्र अशी प्रतिष्ठा लाभलेली दिसत नाही. संस्कृत साहित्यात विनोद नाही असे नव्हे. अनेक श्रेष्ठ ग्रंथांत आपणाला मध्येच गुदगुल्या करणारे सौंदर्य नजरेला पडते. मृच्छकटिक नाटकात तर शूद्रकाने श्रेष्ठ विनोद साधलेला आहे. पण एकंदरीत प्रमाण पहाता इतर रसांच्या मानाने विनोद कमीच. कदाचित तत्कालीन साहित्यप्रेमिकांची प्रवृत्ती अधिक गंभीर असावी. कदाचित त्यांच्या संसाराचा 'ताप' आताइतका चढत नसल्याने त्याला विनोदाच्या मोठ्या 'डोसा'ची जरूर लागत नसावी.

संस्कृत ग्रंथात जसा विनोद आढळतो तसा स्फुटकाव्यातही आढळतो. याचे स्वरुप आजच्या चुटक्यांसारखे असते. क्वचित् हा कुचेष्टेकडे झुकलेला दिसला तरी त्यातील कल्पनाचमत्कृती गुदगुल्या करते. काही ठिकाणी शृंगारिक म्हणून एकादा श्लोक वाचू जावे तर त्यातील कल्पना निघते विनोदाकडे झुकणारी. पुढील श्लोक पहा.

मृद्वंगि कठिणौ तन्वि पीनौ सुमुखि दुर्मुखौ ।।
अतएव बहियार्तौ. हृदयात्ते पयोधरौ ।।

"तू आहेस मृदुला; हे आहेत दगड. तू आहेस शेलाटी; हे आहेत जाडे ढोल. तू आहेस सुमुखी; हे आहेत काळतोंडे. त्यामुळे या स्तनाना तू देहाबाहेर झोकून दिलेस हे साहजिकच आहे."

आणखी एक श्लोक पहा.

"तरुण्यालिंगितः कंठे–नितम्बस्थल-माश्रितः
गुरूणाम् संनिधानेऽपि–कः कूजति मुहुर्मुहु ।।"

"याच्या गळयात पोरीने मिठी मारली आहे. हा पोरीच्या कमरेवर चढला आहे. इतके थोर लोक पहात असताना मुद्धा हा चवक् चुवुक अशा कानगोष्टी करीत आहे. हा पाण्याचा हंडा मोठा भाग्यवान."

असले श्लोक वाचून जी गम्मत वाटते ती शृंगारजन्य आहे, आहे, असे भासत असताच एकदम कलाटणी घेऊन कल्पना-चातुर्याने विनोदात रूपांतर पावते.

"अस्ति ग्रीवा शिरो नास्ति द्वौ भुजौ करवर्जितौ
सीता हरणसामर्थ्यो–न रामो नच रावण :।।

"अगवाई, याला मान आहे पण डोकेच नाही. याला दंड आहेत पण हातच नाहीत. हा राम नाही, रावण नाही. पण याने सीताहरण केले की!" हे वर्णन आहे ब्लाउझचे. त्याने हरण करून नेलेली सीता म्हणजे अर्थातच स्तनांच्या मधील खोल पन्हळ.

असो. अशा श्लोकात शृंगारावरोबरच सूक्ष्म विनोदाचे झरे मिसळले असले तरी असाच सारा विनोद शृंगाराच्या आश्रयाने आहे असे नाही.

हा श्लोक पहा.

"चितां प्रज्वलितां दृष्ट्वा वैद्यो विस्मयमागतः
नाहं गतो न मे भ्राता कस्येदं हस्त-लाघवम् ?"











अनुक्रमणिका

ज्या गावात हा श्लोक रचला गेला तिथे दोन सख्खे भाऊ CONSULTANT म्हणून वैद्यकीय व्यवसाय करीत. एकदा स्मशानाकडून येत असता एकाला एक चिता जळताना दिसली. तेव्हा त्याला आश्चर्य वाटले. तो मनात म्हणाला, "आज चिकित्सेसाठी मी गेलो नव्हतो. माझा भाऊही गेलेला नव्हता. मग हा पराक्रम कुणाचा?"

एक खगोल शास्त्रज्ञ रात्रभर सौधावर उताणा निजून आकाशनिरीक्षण करीत असतो. तो ज्ञानसाधनेचे महत्कार्य करीत असला म्हणून त्याची कुचेष्टा होणार नाही असे थोडेच?

ही पहा.

"गणयति गगने गणकः चंद्रेण समागमं
विशाखायाः
विविध भुजंगक्रीडासक्तां गृहिणीं न
जानाति ।।"

"विशाखेची तारका आता चंद्राच्या मिठीत कशी शिरणार याचे गणित करीत हा वेडा बसलेला आहे. याची गृहिणी खाली कुणाच्या मिठीत शिरलेली आहे याचा याला पत्ताहि नाही."

विनोदाची कुऱ्हाड चालू झाली कीं कुणीही तिचा विषय होते. भल्याभल्यांचे व्यंगचित्र प्रकट करण्याची विनोदकाराला मुभा असते. हे उदाहरण पहा.

एक गाव होता. तेथे होते पुराणिक. पुराणिकाच्या भाग्यशाली व्यवसायात अशी काही गोम आहे कीं त्या महाभागाचे सूत कुठेतरी जुळणे अधिक सुलभ होते. या सामान्य अनुभवाला हेही पुराणिक अपवाद नव्हते. मग व्हायचे ते झाले. बोभाटा झाला तेव्हा एक इरसाल तज्ञ पुराणिकांविषयी म्हणाला,

"पौराणिकानाम् व्यभिचारदोषो
नाशङ्कनीयः कृतीभिः कदाचित् ।।
पुराणकर्ता व्यभिचारजातः
तस्यापि पुत्रो व्यभिचारजातः ।।"

"पुराणिकांच्या हातून व्यभिचार घडला तर त्यात शहाण्या माणसानी दोष मानावयाचा नसतो. ज्याने अठरा पुराणे लिहिली तो व्यास पराशर आणि सत्यवती यांच्या व्यभिचारातून जन्मला. त्याने स्वतःही अंबिका आणि अंबालिका यांशी व्यभिचार करून चित्रांगद आणि विचित्रवीर्य या आपल्या पुत्रांस जन्म दिला."

लक्ष्मीचे हे वर्णन पहा.

"गोभिः क्रीडितवान् कृष्ण इति
गोसमबुद्धिभि ः।।
क्रीडत्यद्यापि सा लक्ष्मी अहो देवी
पतिव्रता ।।

"कृष्ण हा गाईबैलांसवे खेळला. म्हणून त्याची पत्नी लक्ष्मी अजून जे बैलबुद्धीचे लोक असतात त्यांच्याशीच सूत जमविते. ही पतिव्रता धन्य होय."

काव्याची प्रगती सतत होत असल्याने नवकवी ही संस्था नेहमीच नवी आहे. जुन्या कवीनी त्यांची कुचेष्टा करावी हेही सनातन आहे. त्यावेळीही अशी चेष्टा चाले. "अप्रगल्भाः पदन्यासे जननीरागहेतवः सन्त्येके बहुलालापाः कवयो बालका इव।।"

"अरे ही पोरे काय कविता करणार? याना धड पाऊल नीट टाकता येत नाही. (काव्यातील पदयोजना नीट करता येत नाही.) हे केवळ आपल्या आईला तेवढे 'बाव्या' वाटतात (जन+नीराग.हे लोकांच्या संतापास कारण होतात.) अजून याना लाळ सावरता येत नाही (हे भरमसाट वायफळ काव्य प्रसवतात)"

"विपुलहृदयाभियोग्ये खिद्यति काव्ये
जडो न मौर्ख्ये स्वे
निंदति कंचुकमेव प्रायः शुष्कस्तनी
नारी ।।"

"हे नवकवि आपल्या मूर्खपणाची निंदा न करता जुन्या उत्तम काव्याची निंदा करीत असतात. साहजिकच आहे. जिच्या वक्षस्थळाला डौल नाही ती, चोळी ताठ बसली नाही कीं चोळीच्या शिलाईला नावे ठेवणारच."

नवकवीनाच वाईट वाटावयास नको. तार्किक व्याकरणकार असे लोकही कुचेष्टेतून सुटलेले नाहीत. एक जार म्हणतो,

"परामृशन्तो लिङ्गानि व्यभिचार-
विचारकाः
तार्किका यदि विद्वांसो विटैः
किमपराध्यते ?"

प्राकृत
विनोद



विश्वसुंदरी—

डावा उजवा टेलेस्टार—
का रॉकेटस् जोरदार,
दूरवाणी लालचुटुक—
अणुबॉम्ब टंच गोलक,
विषुववृत्त टीचभर—
दोन गोलार्ध वावभर,
त्रिमितीयान पाऊल भर—
पांच फुटी कॅपसूल तर;
परीक्षकांचा कोरा पेपर—
विश्वसुंदरी तूंच खरोखर !

—माधव ताम्हनकर

हे तार्किक आणि व्याकरणकर्ते लोक सारखे लिंगांच्यामधे लुडबुडत असतात. व्यभिचाराशिवाय याना दुसरा विचार नाही. हे जर विद्वान म्हणून मिरविणार तर आम्हीच काय घोडे मारले आहे?"

वैद्याच्या कुचेष्टेचा एक श्लोक पूर्वी दिला. दुसरा एक श्लोक सर्वविख्यात आहे. तो असा.

"वैद्यराज नमस्तुभ्यं यमराजसहोदर
यमस्तु हरति प्राणान् वैद्यः प्राणान्
धनानि च."

"वैद्यराज, नमस्कार! नमस्कार! अहो तुम्हाला आधी नमस्कार. कारण तुम्ही यमाचेही वडिलदादा. तो बिचारा प्राणच घेऊन जातो. तुम्ही प्राण तर नेताच आणि वर दक्षिणा म्हणून धनही नेता."

आजचा बिच्चारा कारकून हा करुणेचा विषय झालेला आहे. (अर्थात् कारकून जवळपास नाही असे पाहून त्याचीही

हात भिजवून घेण्याविषयी निंदा होते.)
संस्कृत कारकुनाचे हे चित्र पहा.

"विना मद्यं विना मांसं परस्वहरणं विना.
विना परापवादेन दिविरो दिवि रोदिति ।।

"अरे हा बिच्चारा कारकून दिवसाच कपाळाला हात लावून बसला आहे. आज त्याला कुणी एक पेग पाजला नाही. कुठे पुल्खा झोडायला मिळाला नाही. कुणाचा गळा कापून चार पैसे खिशात पडावे तेही आज नाही. निदान कुणाबद्दल कंडी पिकवावी तर तसाही योग आज आलेला नाही. अरेरे."

शेषशायी भगवान लक्ष्मीकडून पाय दावत घेत बसलेला असतो. कवी त्याविषयी म्हणतो,

"लक्ष्मीवन्तो न जानन्ति प्रायेण परवेदनाम् ।।
शेषे धराभरक्लान्ते शेते नारायणःसुखम्।।

"लक्ष्मीचे सूख लागलेला माणूस दुसऱ्याचे दुःख कुठून जाणणार. पृथ्वीचा भार डोक्यावर पडल्यामुळे आम्ही दबून फुगलो आहोत. तर जसजसे आम्ही अधिक भाराने अधिक फुगू तसतशी या नारायणाला अधिक मऊ गादी मिळते म्हणून तो सुखाने झोपला आहे."

विनोदाचा उपयोग तत्वज्ञाच्या दृष्टीने अडचणीना सामोरे जाण्यासाठीही केलेला दिसतो. हा श्लोक पहा,

"हे दारिद्र्य नमस्तुभ्यं सिद्धोऽहं त्वत्प्रसादतः
पश्याम्यहं जगत्सर्वं न मां पश्यात कश्चन।।

"हे दारिद्र्या, तुला नमस्कार असो. आज तुझ्यामुळे मी योगसिद्धी पावलो आहे. पहा तर खरे. मला सर्व काही दिसत आहे. पण मी मात्र कोणालाच दिसत नाही."

'भल्याची दुनिया नाही हो' ही गोष्ट संस्कृत कवी अशी प्रकट करतो.

"परीक्ष्य सत्कुलं विद्यां शीलं शौर्यं सुरूपताम्
विधिर्ददाति निपुणः कन्यामिव दरिद्रताम् ।।"

"ब्रह्मदेव हा मोठा निपुण बाप आहे. वराचे कुळ, शील, विद्या, पौरुष, सौंदर्य हे सारे नीट आहे असे पाहूनच तो आपल्या दरिद्रता या कन्येचा त्याच्याशी विवाह जुळवून देतो."

महर्षी व्यास, भगवान श्री विष्णू यांच्या मागे लागणारा संस्कृत कवी कवडीचुंबकाला सुटा सोडील हे अशक्यच. तो म्हणतो,

"कृपणः स्ववधूसंङ्गं न करोति भयादिह भविता यदि मे पुत्रः स मे वित्तं हरेदिति।।"

"कृपण माणूस धनाला शिवत नाही यात काय नवल! तो बायकोलाही शिवत नाही. हो. काही कमी अधिक झाले आणि बायको गरोदर राहिली तर पुढे पुत्र होईल तो पैसा खर्चिल अशी त्याला भीती असते."

हा कृपण माणूस आईच्या गर्भात असतानाच आपले पायगुण दाखवितो.

"सति द्राक्षाफले क्षीरे मृदामास्वादनं मुखे ।।
अहो मातुरियं रीतिः कृपणे गर्भवर्तिनि ।।"

"पुढचात द्राक्षाफले असतात. पायस असतो. पण गर्भ कृपणाचा असेल तर तो आईच्या मुखातून माती खाण्यातच आनंद मानित असतो. उगाच जिभेला चटक लागणे बरे नव्हे."

ज्याला टोचते त्याला कळते. त्याप्रमाणे ज्या शेषाच्या अंगावर नारायण झोपतो त्याला त्याचे कारण वेगळे वाटते. पण आपल्या कुबट खोलीत, तेलकट गादीवर, वाशेऱ्या पांघरुणात झोपलेल्या कुणाच्या समोर जेव्हा शेषशायीचे चित्र येते तेव्हा तो मनात म्हणतो,

"कमला कमले शेते हरः शेते हिमालये
क्षीराब्धौ च हरिः शेते मन्येम त्कुणशंकया। ।।"

"या ढेकणानी जीव खाल्ला बुवा. याना भिवूनच कमला झोपण्यासाठी कमळात गेली असावी. शंकराने आपले बाजले हिमालयावर घातले असावे आणि विष्णूने झोपण्यासाठी क्षीरसमुद्रातील शेष निवडिला असावा. भाग्यवान लेकाचे."

श्राद्धाला जेवणाऱ्या ब्राह्मणाला कवी म्हणतो,

"परान्नं प्राप्य दुर्बुद्धे मा प्राणेषु दयां कुरू
दुर्लभानि परान्नानि प्राणा जन्मनि जन्मनि ।।"

"अरे गाढवा हात काय आखडतोस? फुकट मिळाले आहे. जिवाची काळजी करू नकोस. पोट फुटेतो खा. पोट फुटून प्राण गेला तरी पुढच्या जन्मी प्राण मिळेल. पण मोफत अन्न मात्र दुर्लभ आहे."

कवी म्हणतो या जगात भाग्यवान फक्त दोघे.

"असारे खलु संसारे सारं श्वशुरमंदिरम्
हरो हिमालये शेते हरिः शेते महोदधौ ।।

"या कष्टमय संसारात सुखाची सावली मिळते ती सासऱ्याच्या घरी. त्यामुळे शंकर सदाचा आपला सासरा हिमालय त्याच्या घरी रहातो. विष्णु आपला सासरा समुद्र त्याच्याकडे रहातो."

द्विभार्या प्रतिबंधक कायद्याला शिव्या देणाऱ्यांस कवी म्हणतो,

"बिलाब्दर्हिबिलस्यान्तः स्थितमार्जार-सर्पयो :।।
मध्ये चाखुरिवाभाति पत्नीद्वययुतो नरः।।

"भाग्यवान, भाग्यवान आहेस बाबा तू. तुला दुसरी बायको मिळत नाही म्हणून कष्टू नकोस. माझी अवस्था पहा. माझ्या या बाजूस एक बायको. त्या बाजूस एक आणि माझी स्थिती कशी? बिळाच्या टोकाशी साप असावा आणि बिळाच्या तोंडाशी मांजर असावे अशा बिळातील उंदिरासारखी."

सासऱ्याचे घर जावयास सुखावह. म्हणून काही शंकराचा सहवास सासऱ्याला सुखावह नाही. कवी म्हणतो,

"सदा वक्रः सदा क्रूरः सदा पूजामपेक्षते
कन्याराशिस्थितो नित्यं जामाता दशमग्रह :।।"

"कन्याराशीत नेहमीच असणारा जावयी हा दहावा दुष्टग्रह आहे. हा नेहमी वक्री चालतो. सदा क्रूरदृष्टीने पहातो. सदा मानसन्मानाची अपेक्षा करतो."

[ पृष्ठ ५८ वर पहा ]










# "पेनांग"ची सफर

यंदाचे वर्ष हे आंतर-राष्ट्रीय पर्यटन वर्ष ! आणि प्रवासवर्णनेहि नाना तऱ्हेची नाना देशी परदेशी लोकांनी लिहिलेली आपण वाचली आहेत.
सामान्य नागरीक आणि नौदलातील अधिकारी व खलाशी यांच्या प्रवासात, चालीरीतीत खूप फरक असतो. 'दिल्ली' या आपल्या नौदलातील पहिल्या क्रुझरने पेनांगला नौदलाची पहिली ध्वजनौका म्हणून भेट दिली होती. त्या भेटीचे हे वर्णन लेफ्ट.-कमांडर **श्री. एस. एस. कुमार** यांच्याच शब्दात सादर केले आहे.

**जगातील** अनेक देशांपैकी ज्या ज्या ठिकाणी आपल्या वकिलाती आहेत, किंवा हाय कमिशनर्स आहेत, त्यांचे मार्फत भारतीय नौदलाची सदिच्छा भेट ठरविली जाते. परराष्ट्रखाते, संरक्षण खाते आणि अर्थखाते या तिघांच्या संबंधित वरिष्ठांची चर्चा होऊन तो दौरा ठरविला जातो. आपल्या आगबोटी चीनसकट सर्वच देशांचे पाणी चाखून बसल्या आहेत. अमेरिका व ऑस्ट्रेलिया इतका दूरचा पल्ला मात्र आपल्या नाविकाना सदिच्छा दौऱ्याच्या रूपाने मारा-वयाचा आहे. भारतीय नौदलातील जुने सेवक व कर्मचारी दुसऱ्या युद्धाच्या काळातही बोर्निओ, मलेशिया, आफ्रिका व ब्रिटनचे पलिकडे गेलेले नव्हते. पण भारत स्वतंत्र झाल्यानंतर ती संधी मिळाली. तिचा पुरेपूर फायदा आपले नौदल सर्व परिस्थितीचा विचार करून घेत असते.

पहिले डिस्ट्रॉयर 'म्हैसूर' आणि नंतर आलेले क्रुझर व ध्वज-पोत 'दिल्ली' यानी तर खूप सफरी केल्या आहेत. 'दिल्ली'वर एकेकाळी लेफ्टनंट म्हणून काम करणारे विद्यमान लेफ्टनंट कमां-डर कुमार याना परदेशाचे पहिले दर्शन घडले तेच 'दिल्ली'च्या पेनांग-दौऱ्यामुळे. तो दौरा सिलोनमधील आपल्या हायकमिशनरनी ठरविला होता. १९६० च्या वसंत ऋतूतील त्या प्रवासाची माहिती लेफ्ट. कमांडर कुमार यानी सांगितली. पेनांगचा भूगोल व तसले प्रवासी पर्यटकी थाटाचे वर्णन मात्र कुमार यानी टाळले. ते म्हणाले, "ते अनुभव सर्वस्वी वैयक्तिक स्वरूपाचे असतात. तेव्हा आपण या दौऱ्याचा विचार 'नेव्हल एटिकेट्स्' या दृष्टीने करूया."

त्या वेळी "दिल्ली"चे अधिपत्य होते कॅप्टन एन्. कृष्णन् यांचेकडे. दुसऱ्या महायुद्धात रॉयल इंडियन नेव्हीतर्फे "डिस्टिंग्विश्ड् सर्व्हिस क्रॉस" (डी. एस. सी.) मिळविणारे ते एकमेव भारतीय अधिकारी होते तर मी एक्झिक्युटिव्ह केडरमध्ये लेफ्टनंट होतो. आणि खूपच ज्युनियर ऑफिसर गणला जात होतो.

परदेशी आगबोटीना कोणत्याहि बंदरात सुखरुपपणे आण-ण्याचे काम "पोर्टपायलट" करतात. पोर्ट-पायलट्स् त्यासाठी मोटर लाँच वापरतात. पायलटिंग याचा अर्थ रस्ता मोकळा करून, निर्धोक करून देणे असा होतो. पायलटिंगमागे दोन हेतू असतात. आगबोट सुरक्षितपणे यावी हा हेतू उघडच आहे. त्याचप्रमाणे आगबोटीवर कोणी साथीच्या रोगाने आजारी असल्यास त्याची क्वारंटाईनमध्ये (आरोग्य केंद्र) रवानगी करणे, आयात-निर्यात कायदे धाब्यावर बसवून चोरटा व्यापार करणाऱ्यांचा माल हुड-कणे, आगबोटीशी संबंधित पासपोर्ट कागदपत्रे इत्यादींची तपासणी हे कार्य ते पायलट बारा महिने, तेरा काळ अहोरात्र करीत असतात. पण त्या पेनांग दौऱ्याचे वेळी आम्ही 'पायलट नको' असे कळविले होते. कारण 'दिल्ली' त्यापूर्वीही पेनांगला जाऊन आलेली होती. आमची ती विनंति रॉयल मलेशियन नेव्हीने मान्य केली.

पेनांगपासून चोवीस तासांची मजल उरली, नि आमची धाव-पळ, गडबड सुरू झाली. "अमुक दिवशी सुमारे इतक्या वाजता आम्ही बंदरात दाखल होत आहोत. कृपया नोंद घेऊन आमची जागा राखून ठेवावी," असा संदेश आम्ही दिला. आणि "तुमचे स्वागत असो" असे प्रत्युत्तर लगेच मिळाले.

दोनच दिवसांपूर्वी पेनांगची संपूर्ण माहिती सर्वांना देण्यात आली होती. तेथे कसे वागावे, तेथील रीति-रिवाज काय आहेत, याची उजळणीही आमच्याकडून सतत आठवडाभर करून घेतली जात असे. मलेशियन डॉलर व भारतीय रुपया यांचे आर्थिक व्यव-हार सोप्या भाषेत समजावून सांगण्यात आले होते. सर्व कार्यक्रमांची तपशीलवार माहिती सर्वांना देण्यात आली होती. सर्वच अधिकारी व खलाशी एकाच वेळी बंदरावर जाणे शक्यच नसते. तेव्हा तशी गटश: विभागणीहि पूर्ण करण्यात आली होती. "परराष्ट्रात तुम्ही भारताचे वकील म्हणून गणले जाल. तुमच्या प्रत्येक शब्दाचा वेध







अनुक्रमणिका

घेतला जाईल. बारीक सारीक हालचालही सूक्ष्मपणे टिपली जाईल. तुम्ही पाहुणे असल्याने तुम्हाला तेथील लोक तत्परतेने मदत व मार्ग-दर्शन करतील. बंदरावर गेल्यानंतर मौजमजा आलीच. तीही करू नका असे नाही सांगत.पण प्रत्येक गोष्ट करताना देशाची इभ्रत सांभा-ळण्याकडे कटाक्षाने लक्ष पुरविले पाहिजे, एवढेच निक्षून सांगणे. आपल्या बोटीवर जेव्हा एतद्देशीय मंडळी येतील तेव्हाही आपल्या सौजन्यपूर्ण वागणुकीने आपण त्याना जिंकले पाहिजे. भारतीय आदर्श व्यवहारात आणले पाहिजेत," हा उपदेश कानीकपाळी अक्षरशः ओतला गेला होता. पेनांगला जर काही कोठे चुकले; तक्रारी वा कुरबूर ऐकू आली तर तुमची धडगत नाही; याद राखा, अशी जरबही देण्यात आली होती. त्यामुळे आमच्यासारखे नवखे बावरून गेले होते. तर अनुभवी मंडळी आपापल्या नव्या दोस्ताना पेनांगच्या जीवनाची मजा कशी लुटावी, यावद्दल मौलिक मार्गदर्शन करीत होते.

पेनांगला पोहोचण्यास आठ तासांचा अवधि उरला. दूरवर पेनांगचा किनारा दिसू लागला. थोडयाच वेळात आम्ही पेनांगपासून एका तासाचे अंतरावर आलो. अपर-डेक सर्व अधिकारी आणि खलाशी यांच्या शिस्तबद्ध रांगांनी फुलला. क्वॉर्टर–डेकवर (ब्रिजच्या खालच्या बाजूला उजवीकडे मोकळी असलेली जागा) बँड-ब्युगलर्स आणि 'गार्ड ऑफ ऑनर' सज्ज होता. पंक्तिबद्ध झालेले अधिकारी व खलाशी यांचा वेष पांढरा पण नेहमीचाच होता. तर बँड आणि गार्ड्स् समारोह–गणवेषात (सेरेमोनियल ड्रेस) असल्याने करडया रंगाच्या 'दिल्ली' चे ते राखी डेक वेगवेगळया रंगछटानी फुलले होते. ध्वज-काठीवर नौदलाचे निशाण डौलाने फडकत होते, तर ब्रिजच्या समोर मागच्या पार कडेच्या टोकावर भारतीय राष्ट्रध्वज फडकत होता. (भारतीय नौदलाच्या निशाणात वरच्या बाजूच्या उजव्या हाताच्या कोपऱ्यातील राष्ट्रध्वजाची छोटी प्रतिकृति समाविष्ट असतेच. जागतिक नौदल आणि व्यापारी आगबोटींचीही तशीच प्रथा असते.) अर्धा तास पटकन गेला.

"पेनांग बंदरात आपले स्वागत असो." या संदेशाने आम्हाला प्रवेशाची अनुमति मिळाली.

'दिल्ली' हळूहळू धक्क्याचे दिशेने पाणी कापीत होती. तो विशिष्ट क्षण येताक्षणीच 'कंपनी ऽ अटेंनशन्' ही आज्ञा डेकवर घुमली. तोपर्यंत त्या लोकाना 'दिल्ली'च्या कठडयांभवती विशिष्ट पद्धतीने अर्ध वर्तुळाकार उभे करण्यात आलेले होतेच. अर्धा तास चालू असलेले 'सॉफ्ट टयून्स' बंद झाले. त्यांची जागा 'मार्शल-टयून्स'नी घेतली. "सॅल्यूट टू आर. एम्. एन्. ॲडमिराल्टी !" अशा आशयाची आज्ञा सुटताच सर्वांनी स्मार्टली सॅल्यूट ठोकले. बंदुकी "प्रेझेंट आर्म्स!"मधे आल्या. त्याचवेळी दोन्ही देशांची राष्ट्रगीते वाजविण्यात येत होती. आम्हाला मिळालेल्या वर्षपासून आम्ही एक मैल अंतरावर असताना एकवीस तोफांची सलामी डागली. आपल्या भारतात फक्त राष्ट्रपतींनाच एकतीस तोफांची सलामी मिळते. बाकीच्या सर्वांना एकवीस तोफांची सलामी दिली जाते. रॉयल मलेशियन नेव्हीनेही आमची सलामी प्रत्युत्तराने स्वीकारली. गनसॅल्युटची पद्धत अशी की पहिल्या प्रथम 'आपण' तोफ डागावयाची. त्याला तोफेनेच 'प्रत्युत्तर' मिळते. या क्रमाने एकवीस तोफांची सलामी पूर्ण होते.

'दिल्ली'च्या मुख्य डोलकाठीवर मलेशियन राष्ट्रध्वज फड-कावण्यात आला. त्यानंतर त्याला सलामी देण्यात आली. तो सारा सोहळा अवघ्या दोन मिनिटे एकवीस सेकंदांत आटोपला.

धक्क्यापासून तीन केबल्स (सुमारे सहाशे यार्ड) अंतरावर असताना क्वॉर्टर डेकवरून आम्ही सर्व पांगलो व आपापल्या कामावर हजर झालो. एरव्हीच्या गप्पा, गोंगाट, गोंधळ यांचा मागमूसही नव्हता. हळुहळू बोट एका तरत्या आधाराजवळ (ब्युयो) आली. आणि त्याच्या हूकला एक लोखंडी तार अडकविण्यात आली. बोट धक्क्याला लागता-लागता डेकच्या सर्व उघडयो भागावर ताडपत्र्यांचे छप्पर (ऑनिंग) उभारण्याचे काम पूर्ण झाले होतेच.

सर्व ध्वज आपापल्या ठिकाणी फडकू लागले. ध्वजांची जागा व ध्वज लावण्याची पद्धत ठरलेली आहे. ती अशी. आगबोट दर्यावर किंवा बंदरात असतानाहि फक्त त्या त्या नौदलाचे किंवा आगबोट कंप-नीचे निशाण फडकत असते. ते मुख्य डोलकाठीवर (मेन मास्ट) नसते. ध्वज-काठीवर त्या त्या राष्ट्राची पताका असते. ती आगबोट ध्वज-नौका असल्यास त्या एन्साईनऐवजी ध्वजाधिकाऱ्याचा (ॲडमिरल ऑफ दि फ्लीट किंवा फ्लॅग ऑफिसर-कमांडिग) ध्वज फोअर-मास्ट-वर फडकत असतो. राष्ट्रपति, राष्ट्राध्यक्ष किंवा त्या देशाचा सम्राट जर आगबोटीवर असेल तरच राष्ट्रध्वज मुख्य डोलकाठीवर फडका-वला जातो. एरव्ही स्टर्न मास्टला तो लावला जातो. नौदलाचे किंवा त्या कंपनीचे निशाण लावण्यासाठी जी स्वतंत्र डोलकाठी असते, तेथे ते निशाण मात्र सदैव फडकत असते. तसेच जॅक स्टाफवर छोटा राष्ट्रध्वजही असतो. असो.

तेवढे होईपर्यंत रॉयल मलेशियन नेव्हीतर्फे पाठविण्यात आलेला गार्ड-ऑफिसर 'दिल्लीवर' येवून दाखल झाला. त्याच्या स्वागतार्थ पाईप वाजविण्यात आला, आणि एक अधिकारी त्याला कमांडिंग ऑफिसरकडे सन्मानाने घेवून गेला. गार्ड ऑफिसर-बरोबर आलेल्या नाविकांजवळ टपालाच्या वंग्या होत्या. त्यावरच खरे तर सर्वांचे लक्ष खिळलेले होते. गार्ड ऑफिसरने समारंभपूर्वक त्या वंग्या कमांडिंग ऑफिसरच्या स्वाधीन केल्या. तसेच 'दिल्ली'चा कार्यक्रम, स्थानिक सूचना, हवामानाचा अंदाज वगैरे कागदपत्रही देण्यात आले. त्यानंतर थोडया वेळाने त्या गार्ड ऑफिसरसमवेत कप्तानसाहेबांची स्वारी डेकवर आली. त्यानी डिव्हिजन्सची पहाणी केली, त्यावेळी मानवंदना देण्यात आली. पेनांग येथील सर्वोच्च मुलकी अधिकाऱ्याची भेट हा कप्तानसाहेबांचा तेथील पहिला कार्यक्रम होता. त्यानंतर नौदल, लष्कर वायुदल वरिष्ठांच्या भेटी होतात. तो कार्यक्रम आटोपण्यासाठी समारोह-वेषात कप्तानसाहेब, तो गार्ड-ऑफिसर आणि कप्तानसाहेबांसमवेत अन्य काही

अधिकारी बाहेर पडले. त्यानंतर आम्ही जरा हाशहुश केले. दम टाकला. दरम्यान टपालाच्या थंग्या तशाच ठेवलेल्या होत्या...काय हा वैताग. . . ! पण इलाज नव्हता.

"दिल्ली" धक्क्याला लागली तेव्हा सकाळचे साडेआठ वाजले होते. कप्तान साहेब साडेनऊला बाहेर जाऊन अकरा वाजता परतले. त्यानंतर थोडयाच वेळाने पेनांगच्या वरिष्ठ मुल्की, व नौदल आणि अन्य अधिकाऱ्यानी 'दिल्ली' वर येवून परतभेट उरकली. त्यानंतर 'हाय टी'. एक वाजता जेवणाची सुट्टी झाली. त्याचवेळी टपाल वांटपही सुरू झाले. साधारणपणे तीन साडेतीनपर्यंत थोडासा आराम, वरीचशी वैयक्तिक साफसफाई करण्यात वेळ गेला. दुपारी फुटबॉल मॅच झाली. सुमारे तास दीडतास खेळ झाला. गंमत अशी की दोन्ही देशांच्या संघातून मिळून दोन प्रतिस्पर्धी संघ निवडण्यात आले होते. त्यामुळे खेळ चांगलाच रंगला. इतर काही जणांसाठी पेनांगची 'कंडक्टेड टूर' होती. तर तिसऱ्या गटाला रॉयल मलेशियन नेव्हल मेसमधे चहापार्टी झाली. काही ऑफिसर्स व नाविकांनी स्थानिक क्लबांना भेटी दिल्या. सायंकाळी 'दिल्ली'वर पेनांग येथील वरिष्ठ अधिकारी व निमंत्रित नागरिकाना चहापार्टी होती. म्हणून सर्वजण त्यापूर्वी अर्धातास बोटीवर परतले. ती चहापार्टी आटोपल्यानंतर जेवण झाले आणि मग लिबर्टी मिळाली. अरे हो, एक गोष्ट विसरलोच सांगावयाला. सकाळी बोट धक्क्याला लागता क्षणी आमचा सप्लाय ऑफिसर थेट तेथील सरकारी खजिन्यात गेला आणि भारतीय चलन देऊन मलेशियन डॉलर्स घेऊन आला. तत्परतेने सोय केल्याबद्दल कोणी त्याचे आभार मानले, तर कोणी म्हणाले तसे नसते घडले तरच नवल होते. पेनांगला आमचा मुक्काम चार दिवस होता. तेवढया मुदतीसाठी अधिकाऱ्यांना पंचाहत्तर व खलाशाना पंचवीस मलेशियन डॉलर देण्यात आले. पंचाहत्तर डॉलर्सची त्यावेळची किंमत सव्वाशे भारतीय रुपये होती. एक भारतीय रुपया म्हणजे मलेशियाचे साडेसोळा सेंट असा तो हिशेब होतो.

पी. ओ. एल्. (पेट्रोल, ऑईल, ल्युब्रिकंट्स्) यांची साठवणूक पहिल्याच दिवशी झाली. दुसऱ्या शब्दात सप्लाय डिव्हिजनला पहिल्या दिवशी मजा मारण्यास वेळच मिळाला नाही.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी 'ग्रीन्स-पार्क' या नांवाजलेल्या क्लबमधे आम्ही पुष्कळसे ऑफिसर्स गेलो. तेथे पेनांगच्या कलावंतांनी आमची करमणूक केली. तीन चार तास मजा करून आम्ही परतलो. पेनांगच्या शाही मलेशियन दलातर्फे खानाप्रतिखाना; तेथील भारतीयांच्या आदरातिथ्याचा सत्कार वगैरे कार्यक्रमात दिवस कसे भुर्कन् उडून गेले. "दिल्ली" साठी आयोजित प्रत्येक कार्यक्रमाची भरपूर परतफेड "दिल्ली" नेही करून अभ्यागतांना संतुष्ट केले. तर आमच्या नाविकानी आपल्या वागणुकीने तेथील जनतेला आपलेसे केले. तेथील भारतीयांपैकी पुष्कळसे लोक डॉक्टर, इंजिनियर्स, वकील, व्यापारी असेच होते. त्यामुळे सर्व कार्यक्रमांची गोडी अवीट होती.

**'पिनांग'मधील घरे**



'दिल्ली' ने एक दिवस स्थानिक जनतेचे खुले स्वागत केले. हजारो स्त्रीपुरुष आणि मुलांची रीघ 'दिल्ली'वर लागली होती. 'दिल्ली' त्या दिवशी चांगलीच नटली होती. रात्री रोषणाई करण्यात आली होती. त्यादिवशी आमच्या तसेच नाविकांच्या गॅली बॉईज व कँटिन बॉईजच्या कमरेचा कांटा ढिला झाला.

पांचव्या दिवशी पहाटे 'दिल्ली' ने नांगर उचलला. आगमनाप्रमाणे प्रयाणही सोहळयातच पार पडले. फक्त गन् सॅल्यूट तेवढा नव्हता. नि तो नसतोही. बंदरा बाहेर पडता पडता कॅप्टन कृष्णन् यानी दिल्लीतर्फे स्थानिक अधिकाऱ्यांचे ऋणी असल्याचा संदेश पाठविला. "पुनरागमन" असा प्रतिसंदेश आला नि... नि झाले रूटीन सुरू. पण एक आगळा, नवीन अनुभव गांठीशी मारून आम्ही परतलो होतो. गप्पांचे विषय नवीन असल्याने वॉर्डरोन आणि मेसमधे वारंवार खसखस पिकत होती. अंतर्मनात मात्र खळबळ माजली होती.

हजारो वर्षांपूर्वी आमच्या पूर्वजानी येथील सागरी सत्ता आपल्या हाती ठेवली होती. भारतीय नाण्याची किंमत अक्षरशः सोन्याने होत होती. आज मात्र आमच्या रुपयाचे अवघे साडेसोळा सेंट्सच मिळावेत ना ?

•••




**-युद्धनेतृत्व ● मराठी नाटक आणि मराठी रंगभूमि**

## युद्ध कौशल्यही हीं राजनीतिच

**चीन** व पाकिस्तान यांच्याशी जे अल्पकाळ युद्ध भारतास खेळावे लागले त्यामुळ लोक युद्धाच्या रम्य वार्ता वाचण्या-ऐकण्यापेक्षाही युद्धशास्त्र या विषयाबद्दल आपल्याकडे आस्था निर्माण झाली आहे. पण युद्ध व यद्धशस्त्र यासंबंधी इंग्रजी व अन्य भाषात विपुल वाङमय उपलब्ध असले तरी मराठीत त्याचा अभाव जाणवतो. तथापि याही बाबतीत आता अगदी अल्प प्रमाणात का होईना ही वाङमय निर्मिती होऊ लागली आहे. या क्षेत्रात आपल्या पहिल्याच पुस्तकाने श्री. दि. वि. गोखले यांनी आपली चमक दाखविली होती. 'माओचे लष्करी आव्हान' हे त्यांचे पुस्तक हा लेखसंग्रह होता. ते लेख प्रसिद्ध होत होते तेव्हा अत्यंत कौतुकाने वाचले गेले आणि पुस्तकाचा खप हा एक उच्चांक ठरला. परंतु गोखले यांचे ते पुस्तक म्हणजे चित्रपटाचा ट्रेलर होता. आता त्यांचा **युद्धनेतृत्व** हा ग्रंथ प्रसिद्ध झाला असून लेखकाचा युद्धशास्त्रविषयक व्यासंग त्यावरून लक्षात येऊ शकतो. तथापि आपल्या व्यासंगाचे गोखले यानी जादा प्रदर्शन केलेले नाही किंवा व्यासंगाच्या दबावाखाली कित्येकदा आशय गुदमरून जातो तसा तो गेला नाही. काही वेळा विशिष्ट दृष्टीतून व्यासंग केला जातो व त्यामुळे लिखाण एकांगी बनते. गोखले यांच्या बाबतीत हे दोष दिसत नाहीत. आशय व तो मांडण्याची हातोटी यांचा सुंदर मिलाफ 'युद्ध नेतृत्व' या ग्रंथात झाला असून चर्चिल, हिटलर, रुझवेल्ट व स्टालीन यांच्या नेतृत्वाची वैशिष्ट्ये त्यांनी निवेदन केली आहेत. या चार युद्ध नेत्यांच्या वैशिष्ट्य-वर्णनातून युद्धनेतृत्व कसे असावे हे ते सूचित करतात. या नेत्यांच्या चरित्र-वर्णनात गोखले गुरफटून राहात नाहीत तर युद्धकालीन नेतृत्वाची वैशिष्ट्ये ते स्पष्ट करतात. पण या विश्लेषणामुळे पुस्तक रुक्ष व अति तात्विक होणार नाही याची खबरदारी त्यांनी घेतली आहे. चर्चिल, रुझवेल्ट, हिटलर व स्टालिन या चार युद्धनेत्यांची जडणघडण व ते ज्या परिस्थितीत वावरत होते ती भिन्न होती. चर्चिल व रुझवेल्ट हे लोकशाही परंपरेच्या राष्ट्रांचे नेते तर हिटलर व स्टालिन दोघेही सर्वाधिकारी. पण लोकशाही राष्ट्राचा नेता युद्धात गुंतला की त्याला काही वेळा सर्वाधिकाऱ्यासारखा अधिकार गाजवावा लागतो. चर्चिल यांची प्रवृत्ति, त्यांचा अनुभव व त्यांचे व्यक्तित्व या सर्वांचा एकत्रित परिणाम ते युद्धाच्या अनेक क्षेत्रांत हस्तक्षेप करण्यात झाला. पण त्यांच्या चैतन्यदायी नेतृत्वाने ब्रिटीश, सेनापती व सैनिक यांच्यात विलक्षण जिवंतपणा आला. युद्धातील दुर्दम्य आशा-आकांक्षा चर्चिल आपल्या अभूतपूर्व भाषा प्रभुत्वाने प्रगट करीत होते. ब्रिटनच्या इतिहासातील ते सर्वार्थाने सर्वोत्तम दिवस होते. या दिवसांचे व चर्चिल यांच्या नेतृत्वाचे गोखले यांनी मार्मिक विश्लेषण केले आहे. चर्चिल यांच रंगतदार व्यक्तित्व रंगविण्यात गोखले पूर्णतः यशस्वी झाले आहेत.

हिटलर व स्टालिन हे दोघेही सर्वाधिकारी. दोघांच्या नेतृत्वाखाली त्यांच्या देशबांधवानी असीम त्याग केला व असामान्य शौर्य गाजविले. या निमित्ताने हिटलर व स्टालिन यांच्या संबंधीचे काही गैरसमज गोखले यांनी दूर केले आहेत. हिटलर सर्वाधिकारी असला तरी त्याचे सेनापति त्याच्याशी अत्यंत मोकळेपणाने वाद घालीत; त्यांचे वाद झडत आणि प्रारंभीच्या काळात हिटलरचे आडाखे व डावपेच यशस्वी झाले. हिटलर हा पहिल्या महायुद्धात साधा कार्पोरल होता म्हणून त्याच्या लष्करी ज्ञानाची हेटाळणी त्याचे विरोधक करीत. पण हिटलरचे विरोधक दाखवितात तसा तो अज्ञानी नव्हता. उलट त्याचे राजकीय व लष्करी डावपेच बराच काळ यशस्वीच झाले. अनेक आघाड्यांवर त्याने केलेली लढाई, विरोधी शक्तींचे एकत्रित सामर्थ्य आणि व्याप्त प्रदेशात राजकीयदृष्ट्या अनुकूल परिस्थिती निर्माण करण्यात नाझी पक्षाच्या अधिकाऱ्यांच्या धोरणामुळे आलेले अपयश इत्यादी अनेक कारणांनी हिटलरचा पराभव झाला. पण युद्ध नेतृत्वाच्या दृष्टीने विचार केला तर हिटलरचे नेतृत्व अव्वल दर्जाचे होते. त्याने प्रयोगशीलता कधी त्याज्य ठरविली नाही. आणि अशा प्रयोगशील अधिकाऱ्यांना भरपूर वाव दिला. फासिझमबद्दल कोणी प्रेम बाळगणार नाही पण हिटलरचा केवळ युद्धनेता म्हणून विचार केला तर त्याने अनेक श्रेष्ठ गुण कसे प्रगट केले हे गोखले यांनी दाखवून दिले आहे. याबाबतची त्यांनी दिलेली माहिती ही अनेकांना नवी वाटेल.

स्टालीनच्या निधनानंतर क्रुश्चेवने स्टालीनविरोधी भाषण करून त्यास लष्करी ज्ञान नव्हते, त्याच्यामुळे रशियाचे नुकसान झाले अशी टीका केली. क्रुश्चेव यांच हे मत रशियन जनतेने मानले नाही व आज ब्रेझनेव्हही स्टालीनच्या युद्धनेतृत्वाचे माहात्म्य मान्य करू लागले आहेत. हिटलर, चर्चिल, रुझवेल्ट यांच्या मानाने स्टालिन हा अधिक धीमा, आपल्याला काय साध्य करावयाचे आहे याबद्दल मनात कोणताही विकल्प नस-

लेला व हे उद्दिष्ट साध्य करताना कशाचाही विधिनिषेध न बाळगणारा होता. गोखले यांनी अनेक पुरावे देऊन हे सिद्ध केले आहे.

स्टालीनचे डावपेच चर्चिल ओळखून होते, पण रुझवेल्ट यांचे लोकशाहीबद्दलचे अतिरेकी प्रेम, फाजील सौजन्य व भोळसटपणा आणि आजारपणामुळे आलेली बौद्धिक व शारीरिक विफलता यामुळे स्टालीनचे डाव यशस्वी होत गेले. पूर्व युरोप कम्युनिस्टांच्या पंखाखाली जाण्यास रुझवेल्ट यांचे हे अदूरदर्शित्व कारणीभूत आहे. गोखले यांनी दाखवून दिले आहे. पण युद्धाला प्रतिकूल असलेल्या अमेरिकन जनतेला युद्धाला सन्मुख करण्यात रुझवेल्ट यांनी नेतृत्वाचे मोठे गुण प्रगट केले. अमेरिका युद्धात पडल्यावर सारी शक्ति त्यांनी पणाला लावली. अमेरिकेच्या सामर्थ्याने स्टालीनही दिपून गेला. तेथे इतरांचे काय? अर्थात युद्ध जिंकण्यात रुझवेल्ट यांचे नेतृत्व यशस्वी झाले, पण स्टालीनचे डावपेच त्यांनी न ओळखल्याने त्यांचे यश कलंकितच राहील.

गोखले यांनी अशा रीतीने या चार नेत्यांच्या गुणावगुणांचे परीशिलन केले आहे. ते करताना राजकीय व आर्थिक परिस्थितीचे व्यवधानही ते राखतात. युद्ध हा केवळ लष्करी सेनाधिकाऱ्यांचाच विषय असावा व त्यात नागरी सत्तेने हस्तक्षेप करू नये असा विचारप्रवाह आढळतो. मेजर जनरल परांजपे यांनी त्याचा उहापोह प्रस्तावनेत केला आहे. पण गोखले यांनी ज्या चार युद्धनेत्यांच्या नेतृत्वाचे वर्णन केले आहे ते पाहता नागरी सत्ता ही लष्करी अधिकाऱ्यांच्या सत्तेपेक्षा वरचढ असावी असाच निष्कर्ष काढावा लागतो.

श्री. गोखले यांनी हे पुस्तक लिहून मराठीत तरी न रुळलेल्या वाटेने प्रवास केला आहे. या प्रवासात त्यांनी घेतलेले पायेच समृद्ध आहे. जपानी नेत्यांचा अंतर्भाव झाला असता तर दुसऱ्या महायुद्धातील नेत्यांबद्दलचा हा परिपूर्ण ग्रंथ झाला असता. (अर्थात जपानबद्दल आपल्याकडे फार थोडे वाङमय उपलब्ध आहे) त्यांनी या ग्रंथात केलेले प्रत्येक विधान पुराव्यानिशी केले आहे. यासाठी त्यांना किती परिश्रम घ्यावे लागले असतील याची कल्पना केलेली बरी. पण वाचकांच्या कौतुकामुळे त्यांचा जरुर श्रमपरिहार होईल.

**— गोविंद तळवलकर**

[**युद्धनेतृत्व**:— **दि. वि. गोखले.** मॅजेस्टिक ब्रुक स्टॉल. गिरगांव, मुंबई. किंमत १२ रुपये.]

## मराठी रंगभूमीचा विकास झाला आहे ?

**नाटक** मराठी माणसाच्या रक्तात रुजलेले आहे, असा अभिमान आज आपण बाळगतो. आपण ह्या नाटकाच्या वेडातूनच नाटके बघतो. हौशी कलावंत आणि व्यावसायिक नाटक मंडळयांचे धूमधडाक्याने प्रयोग चालू असतात. अशा परिस्थितीत नाटक हा कला-प्रकार अधिक विकसित झालेला आहे अशी सोयिस्कर समजूत आपण करून घेतली व त्या खोट्या समाधानातच आपण मश्गूल झालो आहोत. नाटक आणि रंगभूमि याविषयी गंभीरपणाने विचार आपण केलेला आहे काय ? कठोर आत्मपरिक्षण करावयाचे झाल्यास त्याचे उत्तर नकारात्मकच मिळेल. मराठी नाटक आणि मराठी रंगभूमी यांच्या विषयी काही मूलभूत प्रश्न उपस्थित करून त्यावर त्या क्षेत्रातील मान्यवर व्यक्तींची चर्चा घडवून आणण्याचे कार्य 'समीक्षा' या प्रकाशनातून प्रा. वा. ल. कुळकर्णी यांनी केले आहे. या प्रकाशनात 'मराठी नाटक आणि मराठी रंगभूमि' ह्या विषयावरील त्यांचा लेख घेऊन त्या अनुषंगाने श्री. के. नारायण काळे व श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णी यांनी चर्चा केली आहे. या संपूर्ण चर्चेचे स्वरुप मूलभूत गोष्टींचा विचार, त्यातील जाणवणारे प्रश्न आणि त्या प्रश्नांच्या उत्तरांचा शोध असे आहे.

मराठी नाटकाने 'मराठी परंपरा' न जाणता पाश्चात्य रंगभूमीच्या आधाराने पावले टाकली आणि त्यामुळे मराठी नाटकांची अस्सल परंपरा बाजूला राहून मराठी नाटके सर्वस्वी पाश्चात्य परंपरेनुसार पावले टाकू लागली. मराठी रंगभूमीच्या आणि मराठी नाटकाच्या विकासाला ही गोष्ट मारक ठरली. मराठी नाटकाची परंपरा आणि रंगभूमीची परंपरा ही 'तमाशाच्या रंगभूमी'पासून सुरू होते परंतु आधुनिक मराठी रंगभूमीने ह्या परंपरेची कास न धरता पाश्चात्य रंगभूमीला आपलेसे करण्याचा प्रयत्न केला. त्या प्रयत्नात पाश्चात्य रंगभूमीची अंतर्बाह्य ओळख करून घेऊन पाश्चात्य नाटके पचविणे आवश्यक होते. परंतु प्रत्यक्षात तसे न घडता केवळ बाह्य गोष्टींचे अनुकरण मराठी रंगभूमि करू लागली अर्थात् ह्या पाश्चात्य नाटकांमुळे मराठी रंगभूमि जेमतेम जगू लागली. पाश्चात्य नाटकांची रुपांतरे आणि अनुवाद मराठी रंगभूमीने करावयास सुरवात केल्यामुळे धड संपूर्ण मराठीहि नाही आणि धड पाश्चात्य नाटकातील संपूर्ण अस्सल नाट्यहि नाही अशी अवस्था आजच्या नाटकाला आली आहे. मराठी नाटकांचा आणि रंगभूमीचा विकास ह्यातून होत नाही. ह्याकरिता प्रा. वा. ल. कुळकर्णी असा उपाय सुचवितात कीं आता परत मराठी परंपरेकडे न वळता पाश्चात्य नाटककार आणि त्यांची नाटके यांचा यथार्थ अभ्यास आज होण्याची गरज आहे. त्याकरिता त्या कलाकृतींचे रुपांतर अथवा अनुवाद न करता भाषांतर करणे अत्यंत आवश्यक आहे तरच शेक्स्पियर, इब्सेन, मोलिएर वगैरे समजतील. त्यांच्या कलाकृतींचा यथायोग्य रितीने परिचय होईल. त्यातून खरे नाट्य कोणते याचाहि प्रत्यय येईल. हा विचार अत्यंत तपशीलवारपणे, चिकित्सक दृष्टीने विचार करून इतिहासाचा मागोवा घेत त्यांनी आपल्या लेखात मांडून चर्चेला सुरवात केली आहे.








श्री. के. नारायण काळे यांना प्रा. कुळकर्णी यांच्या लेखातील विवेचनाचा दृष्टिकोण, त्यातील निष्कर्ष बहुतांशी मान्य आहेत. परंतु त्या निष्कर्षांची ऐतिहासिक कारणांची मीमांसा मात्र त्यांना मंजूर नाही. त्यांच्या मते 'तमाशाची रंगभूमि' हे एक प्रा. कुळकर्णी यांचे काल्पनिक गृहित कृत्य आहे. सांस्कृतिक आविष्काराचे, सामाजिक संबंध व जीवन-मूल्ये यांच्या प्रकटनाचे, एक कलात्मक साधन या नात्याने तमाशाच्या रंगभूमीला महाराष्ट्रीयांच्या कौटुंबिक जीवनात किंवा ग्रामीण व्यवहार जीवनात केव्हाहि स्थान प्राप्त झालेले नव्हते. दक्षिणेतील मुसलमानांच्या स्वाऱ्यांबरोबर हा करमणुकीचा प्रकार महाराष्ट्रात आला परंतु त्यात बाजारी करमणुकीपलिकडे कोणताहि 'आशय' किंवा अभिप्राय नव्हता. मराठी रंगभूमीने तमाशाच्या रंगभूमीची कांस न धरता भरताच्या नाटयशास्त्राप्रमाणे आणि संस्कृत रंगभूमीच्या संकेताचा आश्रय घेतला हेच आधुनिक मराठी रंगभूमीच्या विकासाच्या दृष्टीने योग्य झाले. पाश्चात्य रंगभूमि आणि नाटक व भरताची आणि कालिदासादींची परंपरा यातील भेदाचा दीर्घ आढावा घेऊन मराठी रंगभूमीला आज केवळ परकीय नाटकांच्या भाषांतरांची आवश्यकता नसून व्यावसायिक नाटककारांची आहे. मराठी रंगभूमीवरील विविध चळवळींचा परामर्श घेऊन के. नारायण काळे यांनी त्यांच्या लेखाच्या शेवटी असे सुचविले आहे की उद्याच्या भारतीय रंगभूमीचे स्वरुप हे उद्याच्या भारतीय जीवनाप्रमाणे योजनाबद्ध आणि सुसंघटित असणे अपरिहार्य आहे. रंगभूमीच्या परिसरात कार्य करणाऱ्या सर्व कार्यकर्त्यांना आपापल्या कार्याच्या स्वरुपाची, जबाबदाऱ्यांची आपल्या सामाजिक स्थानाची जाणीव असणे आवश्यक आहे. तो कार्यक्षम ठरावा यासाठी त्याला त्याच्या विवक्षित कार्याचे तंत्र, त्याचे तात्त्विक औपपत्तिक अधिष्ठान, तसेच त्याचे सामाजिक स्वारस्य, यांबद्दलची पूर्ण कल्पना असली पाहिजे. त्यात त्याने प्राविण्य संपादन केले पाहिजे. प्रत्येकाला आपले काम जाणतेपणाने व जाणिवेने करता येईल, अशा तऱ्हेचे शिक्षण त्याला देण्याची योजना हा रंगभूमीच्या हिताच्या व विकासाच्या दृष्टीने विचार करणाऱ्यांच्या दृष्टीसमोरील पहिला कार्यक्रम असला पाहिजे.

श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णी यांनाहि प्रा. कुळकर्णी यांचा 'तमाशाच्या रंगभूमि'-बाबतचा मुद्दा मान्य नाही. श्री. के. नारायण काळे यांनी या संबंधात केलेल्या विवेचनाशी ते सहमत आहेत. त्यांच्या लेखातील महत्त्वाचा मुद्दा असा की व्यावसायिक रंगभूमीबरोबरच प्रायोगिक रंगभूमीचेहि कार्य अत्यंत पद्धतशीरपणे होणे आवश्यक आहे. या संदर्भात 'नाटयमन्वन्तर'चे कार्य त्यांनी समोर मांडले. त्या काळात प्रायोगिकतेला स्थैर्य लाभले नाही आज तरी तसे होऊ नये. के. नारायण काळे यांच्या प्रमाणेच श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णी नाटयसमीक्षेची उच्च दर्जाची अपेक्षा करतात. साहित्य समीक्षेला महत्वाचे स्थान देणाऱ्या नियतकालिकांनी आणि रंगभूमीशी प्रेक्षक या नात्याने संबंध ठेवणाऱ्या निव्वळ कथाकाव्याच्या भाष्यकारानी या बाबतीतील आपली जबाबदारी ओळखली पाहिजे. नाटयविचाराच्या सर्वच पुरस्कर्त्यांनी पाश्चात्य नाटयसाहित्याचा व नाटयसमीक्षेचा आवर्जून अभ्यास केला पाहिजे. मराठी रंगभूमीला वैचारिक अधिष्ठान प्राप्त करून देण्याचा प्रयत्न या मार्गाने झाला तर तिच्या परिसरात आज प्रत्ययाला येणारी शब्दलता, संदिग्धता आणि दिशाहीनता नाहीशी होईल.

या चर्चेच्या निमित्ताने मराठी नाटक आणि मराठी रंगभूमी याबाबत प्रदीर्घ आणि चिकित्सक दृष्टिकोनातून उपयुक्त विचार मांडला गेला हे या पुस्तकाचे वैशिष्टय परंतु याबाबत आणखी एक सूचना करावीशी वाटते ती म्हणजे या चर्चेच्या मंत्रधातील मुद्यांचा रंगभूमीशी संबंधित असलेल्या प्रत्येकाने गंभीर विचार करून त्यांना प्रत्यक्षात उतरविणे अगत्याचे आहे. परंतु हे विचार किती थरांपर्यंत पोहोचले असतील ? सामान्यपणे असे विचार प्रत्यक्ष कृतीत उतरविणे आवश्यक आहे. पॉप्युलरने या गेल्या वर्षात पाश्चात्य नाटककारांच्या प्रसिद्ध कृतींची केलेली भाषांतरे प्रसिद्ध करून ही टाकलेली पावले जशी स्वागतार्ह आहेत तशीच प्रायोगिक रंगभूमीहि निर्माण होणे आवश्यक आहे. एकटया 'रंगायन'सारख्या संस्थेनेच 'प्रायोगिक' नाटके करणे पुरेसे नाही. त्याचप्रमाणे प्रेक्षकांच्या अभिरुचीला वळण लावण्यासाठीहि काही लेखनाचे प्रयोग होणे आवश्यक आहे. रंगभूमीच्या आणि मराठी नाटकाच्या विकासाची पावले म्हणून या चर्चेच्या निमित्ताने, मांडला गेलेला विचार स्वागतार्ह आहे. प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे कलाविषयक आणखी काही प्रकाशने 'समीक्षे'ने करावीत ही अपेक्षा भविष्यात पुरी व्हावी.

**—श्रीहरी जोशी**

**[ मराठी नाटक आणि मराठी रंगभूमि. संपादन : वा. ल. कुळकर्णी. पॉप्युलर प्रकाशन, पृष्ठे ८०. किंमत ३ रुपये ]**

---

# साभार पोच

**छोटू हत्तीची गोष्ट**
ले. सरिता पदकी
मूल्य १—०० रु.

**मौज प्रकाशन, मुं. ४**

**नटश्रेष्ठ आणि चार संगीतिका**
ले. बा. सी. मर्ढेकर
मूल्य १०—०० रु.

**गितार**
ले. वा. भ. बोरकर
मूल्य ४—०० रु.

**अजगर**
ले. चिं. त्र्यं. खानोलकर
मूल्य ३—०० रु.

**वणवा**
ले. दि. बा. मोकाशी
मूल्य ६—०० रु.





अनुक्रमणिका

दीपावलीची

सन्मानपुष्पे

## फुले, पुस्तके आणि पुराणवस्तु यांना 'परब्रह्म' मानणारा राष्ट्रपति

**डॉक्टर** झाकीर हुसेन ह्यांनी राष्ट्रपतिपदाची निवडणूक प्रतिष्ठेने लढविली आणि आता प्रतिष्ठेने ती जिंकली आहे. परीक्षेचा निर्णय होईपर्यंत सारेच विद्यार्थी 'नक्की पास'च्या वर्गात असतात. त्याचप्रमाणे निर्णय लागेपर्यंत 'आमचा उमेदवार नक्की' असं म्हटलं जात होतं. डॉ. झाकीर हुसेन यांची प्रचंड बहुमताने राष्ट्रपतिपदासाठी निवड झाली आहे. ह्या निवडणुकीला अनेक अर्थानी 'राष्ट्रीय' व 'आंतरराष्ट्रीय' महत्व होते. काही तत्वे, काही ध्येयवाद, काही सिद्धांत येथे 'पणाला' लागले होते. गेल्या वीस वर्षात अशी 'निवडणूक' झाली नव्हती. म्हणूनच डॉ. झाकीर हुसेन यांचे ह्या निवडीबद्दल आम्ही अभिनंदन करतो आणि ह्या भारताचा सर्वोच्च नेता म्हणून त्यांच्या चरणी आमच्या निष्ठा अर्पण करतो.

हा राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय बहुमान काही केवळ 'वारसा' म्हणून, 'रुढी' म्हणून त्यांना मिळालेला नाही. डॉक्टर हुसेन ह्यांनी शिक्षणाच्या क्षेत्रात निष्ठेने जी कामगिरी केली आहे, तिचा व त्यामागच्या निष्ठा-त्यागाचाच जणु हा गौरव आहे असेच म्हणावे लागेल. डॉक्टर हुसेन आज सत्तर वर्षांचे आहेत. त्यांचा जन्म १८९७ त हैद्राबाद येथे झाला. पण माध्यमिक शिक्षण उ. प्रदेशातील एटव्हा येथे झाले. पुढे शिकले अलिगडमध्ये पण बी. ए. एम. ए. ची पदवी मात्र त्यांनी अलाहाबाद विद्यापीठाची मिळविली. १९२० त एम्. ए. झाल्यानंतर त्यांनी दिल्लीतील जमिया मिलियामध्ये शिक्षण घेतले आणि मग ते जर्मनीस गेले. १९२१ मध्ये गांधीजींचा सरकारी शाळा व शिक्षणसंस्थेवरील बहिष्काराचा आदेश प्रमाण मानून त्यांनी कायदेविषयक अभ्यासक्रम सोडला. त्यांनी 'आय. सी. एस.' व्हावे ही पालकांची इच्छा! ती न मानता डॉक्टर हुसेन ह्यांनी दोन वर्षे 'जमिया'त काढली व ते जर्मनीला गेले व बर्लिन विद्यापीठात त्यांनी अर्थशास्त्राचा अभ्यास सुरू केला. तेथे त्यांनी प्रथम अर्थशास्त्राची पदवी मिळविली व नंतर प्रबंध लिहून 'डॉक्टरेट' चीही पदवी संपादन केली. १९०७ ते १९२६ हा काळ त्यांनी अक्षरशः विद्याव्यासंगात घालविला.

'डॉक्टरेट' संपादन करून भारतात परतलेल्या डॉ. झाकीर हुसेन ह्यांनी उच्च सरकारी नोकरीचा मोह न धरता 'जामिया मिलिया'चे कुलगुरुपद स्वीकारले. बावीस वर्षे त्यांनी तेथे मुस्लिम तरुणाना शिक्षणाबरोबरच राष्ट्रभक्तीचे धडे दिले. गांधीजींच्या सहकार्याने संस्थेचा आर्थिक पायाही त्यांनी भक्कम केला. प्राध्यापक म्हणून चाळीस व कुलगुरु म्हणून त्यांना फक्त शंभर रुपये वेतन मिळत असे हे वाचून आश्चर्य वाटेल व त्यांच्या त्यागप्रवण निष्ठेची कल्पना येईल.

"मूलोद्योग शिक्षणा" बाबत त्यांचे मार्गदर्शन गांधीजींना सुद्धा मोलाचे वाटले. 'नयी तालीम'मध्ये पुढे जे विडंबन झाले व फक्त 'सूतकताई म्हणजे मूलोद्योग शिक्षण' असे समीकरण होऊ लागले तेव्हा डॉ. झाकीर हुसेननी त्यावर प्रकट टीकाही केली.

मुस्लिम संस्थेत काम करीत असूनही स्वतःला वा त्या संस्थेला त्यांनी जातीयवादाचा अड्डा बनू दिले नाही. पंजाबात त्यांच्यावर खुनी हल्लाही झाला. 'जामिया'च्या प्रकाशन विभागावरही हल्ला झाला. पण तीन लाखांवर नुकसान झाले असताही झाकीर हुसेन ह्यांनी संयम राखला, कटुता टाळली. १९४८ ते ५६ पर्यंत ते कुलगुरु म्हणून अलिगड विद्यापीठात होते. त्याच काळात विविध शैक्षणिक समित्यांवरही ते होते. १९५७ त ते बिहारचे राज्यपाल झाले. १९६२ मध्ये ते 'उपराष्ट्रपति' झाले. शिक्षण व अर्थशास्त्र हे दोन त्यांचे आवडीचे विषय. काही ग्रंथलेखनही हातून घडले आहे.

बाग आणि प्राचीन अवशेष हा डॉक्टरांचा खास 'वैयक्तिक' विषय. गुलाब जास्त प्रिय, कलमे करतील—जगवतील, प्रयोग चालू असतात सारखे. ठिकठिकाणी जातात. पुराणा वस्तु जमा करतात. खूप वस्तु जमविल्या आहेत. विविध प्रकारच्या जमविल्या आहेत. जमविणे चालू आहे. मुलांना जपणारा आणि

जुन्या अवशेषांमधले काव्य आणि तत्वज्ञान शोधणारा हा माणूस आता फुलासारख्याच कोमल वृत्तीच्या ह्या 'पुराण' देशाचा राष्ट्रपति झाला आहे. इथे शांति स्फुरते. फुलते. बहरते. तशाच 'सनातन' ( पुराण्याही ) श्रद्धाही जगतात, बहरतात. इथे दया, क्षमा, शांति हा 'धर्म' मानला जातो. अशा ह्या देशाचे राष्ट्रपतिपद डॉक्टर झाकीर हुसेन ह्यांना लाभले आहे. 'भारतीय निष्ठा'ना आपण जपाल, जगवाल, विजयी कराल अशा श्रद्धेने हे नेतृत्व आपणास तिने दिले आहे. संकुचिततेवर मात करून दिले आहे. आपण त्या नेतृत्वाची शान वाढवाल व डॉ. राधाकृष्णन्, राजेंद्र बाबूंप्रमाणेच एक थोर तत्वज्ञ राष्ट्रपति म्हणून आपले नांव अजरामर कराल हा विश्वास!

## वाङ्मयातील धोंड्या वाघ

## (याने वि. वि. बोकील)

बोकील आता साठ वर्षांचे झाले. पण वृत्ति ही वयावर अवलंबून नसते. बोकील ह्यांचे वय झाले, केस पिकले, वयपरत्वे शरीरावर काही रेषा उमटल्या तरीही बोकीलांचा 'वसंत' कायम राहिला आहे. त्यांच्या कथांची 'बरसात' होतेच आहे. त्यांची मीना गोष्टी सांगतेच आहे. गारा-धारांचा वर्षाव चालूच आहे. संसारातले रुसवे फुगवे बंद दारातूनही बाहेर ऐकू येतच आहेत. 'संसाराची सर्कस' पहायला आणि 'अष्टगंध' घ्यायला माणसे धावताहेत. बोकील हे कधी 'वृद्ध' झाले नाहीत, कधीही वृद्ध होणार नाहीत. बोकीलांच्या व्यक्तित्वातच 'जुनेपण' नाही. मिश्किल वृत्ति, खट्याळपणा, उपरोध, टवाळी, गंमत जंमत म्हणजे तारुण्य! बोकीलांच्या कथांतून ते तारुण्य ओतप्रोत भरलेले आहे. बोकील यांनी सातत्याने विपुल लेखन केले आहे. बोकीलांची पहिली कादंबरी फोल आशा १९२९ साली प्रसिद्ध झाली तर त्यांचा पहिला कथासंग्रह ( वळवाचे पाऊस ) १९३० साली प्रसिद्ध झाला. पण बोकील गाजले ते 'पहिली मंगळागौर' ( १९४३ ) ह्या चित्रपटामुळे व मीना नीना ( १९४४ ) ह्या नाटकामुळे! 'पहिली मंगळागौर'च्या स्मृति आजही मराठी जनमानसात ताज्या आहेत. नंतरच्या काळात बोकीलांच्या ४९ कादंबऱ्या, ४२ कथासंग्रह, ४ नाटके प्रसिद्ध झाली आहेत. हा लेखनसंसार त्यांनी अवघ्या ३७।३८ वर्षांत उभा केला आहे. शिक्षकीचा व्यवसाय सांभाळून केला आहे हे पाहिले की कौतुक वाटते. १९३१ ते १९३७ ह्या काळात ते शिक्षक होते. ह्याच वर्षी ते सेवानिवृत्त होत आहेत. बाळा जो जो रे, वाट चुकलेले नवरे, ह्या पटकथाही गाजल्या.

बोकीलांच्या साहित्याचे मूल्यमापन काल करील. पण बोकील सातत्याने ३५ वर्षे वेगाने लेखन करीत आहेत. ही गोष्ट मोलाची आहे. बोकीलांचा आत्मविश्वास जबर आहे. त्यांचे तंत्र 'स्वतंत्र' आहे. कुणाचाही 'गंडा' न बांधता बोकीलांनी लेखन केले. तंत्राचा, रचनेच्या कलात्मकतेचा फारसा विचार न करता, त्याची तमा न बाळगता ते लिहीत राहिले आणि 'बोकील' तंत्र सिद्ध झाले. य. गो. जोशी त्यांना धोंड्या वाघ म्हणत. केव्हा, कसा बरसेल सांगवत नाही. विदुषकी बाणा व उपरोध ह्यांचा वापर फार केला. कथा 'सांगण्याची' त्यांची पद्धत आहे. पण बोकीलांच्या ह्या वैशिष्ट्यामुळेच बोकील 'चिर-नव' राहिले. थकले नाहीत. त्यांची कथा 'शिळी' बुरसटलेली' झाली नाही. बोकील 'साठी'चे झाले म्हणून अभिनंदन करतांना त्यांचे ते तरुणपण कायम टिको अशीच कुणीही मराठी माणूस अपेक्षा करील. बोकीलांचा 'वसंत' बहरो हीच इच्छा व्यक्त करतो.

—आदित्य

# लता--या युगातील एक चमत्कार !

**हिंदुस्थानच्या** इतिहासाने असंख्य चमत्कार घडविले. त्या चमत्कारात एका नव्या चमत्काराची नोंद झाली आहे. तो चमत्कार आहे लता मंगेशकर! लता ही केवळ महाराष्ट्राची नाही, भारताची नाही; तर अवघ्या जगाची झाली आहे. तशी कुठलीच कला एखाद्या प्रांताची वा देशाची नसते म्हणा. पण लताचे 'सु-स्वर' ही विश्वपेढीतली अमर ठेव आहे. ती ठेव इथे प्रांती सुखरूप आहे. सुखरूप राहणार आहे. राहो अशीच तिच्या असंख्य चाहत्यांची इच्छा असणार!

मास्टर दीनानाथांनी ह्या मुलीला आपला तंबोरा आणि चीजांची वही दिली. आणि थरथरत्या हातांनी 'विजयी हो' म्हणून आशिर्वाद दिला. आणि एखाद्या 'पुरुषी' कर्तृत्वाने ही लता बहरली. तिने साऱ्या घरच्या मंडळींना दिलासा दिला आणि मग लताचे सूर घराघरातून फिरले आणि लतेची 'श्रीमंति' सर्वत्र पोहचली. 'लता' ही प्रत्येक कुटुंबातलीच एक झाली. लोक लतेला न पाहताही 'आमची लता' म्हणून तिचा उल्लेख करू लागले. देवांनीही हेवा करावा असे खरे तर हे भाग्य! लता ही आपण 'राष्ट्रीय संपत्ति' मानली पाहिजे मंडळी! सुरांचा हेवा करणारी माणसं औरंगझेबाच्या वंशातली असतात. आपण शिवपंथी आहोत ना? मग लताचा जयजयकार करा. सुर-ब्रह्माचा जयजयकार करा, हे अमर स्वरशिल्प घडविणाऱ्या ब्रह्मदेवाचा जयजयकार करा!

लता मंगेशकरने पार्श्वगायिका म्हणून २५ वर्षे पूर्ण केली म्हणून तिचा गौरव करण्यात आला. त्या गौरवप्रसंगी रसिकश्रेष्ठ चिंतामणराव देशमुख अध्यक्ष होते. सौ. देशमुखही आल्या होत्या. बड्यांचे संदेश आले होते. संगीत क्षेत्रातली, चित्रपट व्यवसायातली ( हिंदी, मराठी ) माणसे आली होती. तो सोहळा केवळ 'अपूर्व' असाच होता, मंडळी ! दीनानाथांची २५ वी पुण्यतिथी आणि लताच्या "सोनेरी" आवाजाचा (Golden Voice अशी जाहिरात होती म्हणून ) पंचविसावा वाढदिवस! दोन्ही सोहळे एकदम जोडून आले. 'सोनेरी आवाज' हा शब्द मला बरा वाटला नाही. आवाज आणि सोनेरी? पण मान लिया! कार्यक्रमात काही काही माणसं भलतीच छळून गेली. फोटोग्राफर्स–छळाला काही सीमा? धंदा आहे. ठीक आहे पण लता–देशमुखांना झांकून टाकून फोटो? काही वेळ स्टेजवर फक्त पाठी दिसत होत्या. आणि 'क्लिक्' चे आवाज येत होते. ( अॅक्टिव्ह हुमणे व हृदयनाथचे अभिनंदन ) भाषणात भाषण दिलीप-नौशादचे! वाहव्वा! नौशादजीनी तर कमालच केली. उर्दू शेरशायरात खरा दम, खरी दर्द आणि खरी दाद असते हेच खरं! ! 'तुझा आवाज ऐकायला देव येतो आणि खूष होऊन जातो!' ही कल्पना लोकांना पटली. दाद मिळाली. दिलीपकुमारने उशीरा येऊन फड जिंकला.



## असे पाहिले असे ऐकले

सरकारी बेफिकिरी व अरसिकतेबाबत त्याने उपरोधिक उल्लेख केले तेव्हा लोकांनी 'दाद' दिली. लताचा शासनाने गौरव करू नये ही खंत तर जनतेच्या मनातलीच! दिलीपने ती बोलून दाखविली. "लता मंगेशकर" ही व्यक्ति नाही, शक्ति आहे. तो इतिहास आहे. ती ऐतिहासिक मोलाची गोष्ट आहे. कलावंत समाजाची शाश्वत सेवा करतात. क्षणिक समस्यात गुरफटून गेलेल्या शासनाने ह्या 'शाश्वत' सेवेकडे लक्ष दिले पाहिजे. दिलीपचे भाषण रंगले. दिलीप नुसता नट नाही, उत्तम वक्ता आहे हे पटले. मदन मोहन, मुकेश, नौशाद, जयकिसन यांचीही भाषणे झाली. 'बर्मन नाइट' मध्ये खुद्द लताने भाग घेतला. त्यामुळे चाहत्यांचे कान ( व मन ) तृप्त झाले. मराठी माध्यमातून आणि हिंदी मुखातून हा सत्कार झाला. आशा भोसलेने (लताने फक्त एक मराठी गाणे म्हटले. ) एक गाणे म्हटले. मन्नाडे, हेमंतकुमार, मुकेश, बर्मन ह्यांनी 'नाइट' गाजविली. 'महंमद रफी'ची अनुपस्थिति जाणवली. त्यातली एक गोष्ट मला फार फार आवडली. गेली २५ वर्षे ज्या मंडळींनी लताला 'साथ' केली त्यांचा तिने सत्कार केला. पडद्यामागची माणसे नगाला नेहमीच अज्ञात असतात. त्यांना ऐकू येतो तो लताचा स्वर! पण स्वरसाज व स्वर-साथ देणारी कलाकार मंडळी ह्या निमित्ताने लोकांपुढे आली. फिल्म लाइनमध्ये "दा, दादा आणि भैया" चे प्रमाण जास्त आहे का हो? ही 'दादा' मंडळी बरी वाटली पण! लताचे भाषण 'कृतज्ञते'ने भरलेले, नम्रतेने 'मोठे' झालेले वाटले! 'अहंकाराचा वारा न लागू दे' ही मागणी मोठी नाही काय? चिंतामणरावांचे भाषण झाले छान! पण दीनानाथरावांशी "नाते" शोधीत ते फार फिरले ( हे नाते शोधायलाच हवे होते काय? सत्कार 'लताचा' होता. तिच्या सुरांशी नाते होतेच ) त्यामुळे श्रोत्यांना ती 'ओढाताण' सहन झाली नाही. त्यांनी अक्षरशः टाळ्या मारल्या! ! (आपल्याला फार वाईट वाटले मंडळी–खरच सांगतो) देशमुखानी राजकारण-विद्याक्षेत्र व कलाक्षेत्र याची तुलना करून राजकारण व विद्येच्या क्षेत्रातल्या चुका लोक 'टॉलरेट' करतात. पण कलेच्या क्षेत्रातली

'चूक' टॉलरेट केली जात नाही हे सांगितले. ते मला एकदम पटले. लतेच्या रूपाने अवतरलेल्या स्वरब्रह्माचा जयजयकार!!

## नको तिथे, नको ते

कविवर्य वा. भ. बोरकर 'पद्मश्री' झाले. (बेस झाले). म्हणून त्यांचा "धि गोवा हिंदु असोसिएशन" (धि–शब्दावर जोर द्या– व्यं. ना. नाईक) च्या वतीने साहित्य संघमंदिरातल्या पुरंदरे सभागृहात सत्कार झाला. एकदा ठरून (अपरिहार्य कारणाने–नेहमीचेच) पुढे ढकलला गेला. श्रम फुकट, अपेश पदरी, कार्यकर्ते नर्व्हस! मग एकदम ठरला. घाई झाली. पूर्वयोजना बारगळली. (मुंबईत काय वाट्टेल तेव्हा माणसे हाती सापडतात का काय? त्यात कवींशी संबंध पडला. एक चंद्रावर तर एक स्मशानातल्या सापळ्याची हाडे मोजीत बसलेला. तिसरा विश्वाची अवघी चिंता शिरावर घेऊन विमनस्कपणे समुद्रकिनारी ते गूढ उकलण्याच्या खटपटीत असलेला) मग 'फोना–फोनी' झाली. माणसे जमली. 'तुम्ही थोडं बोला' असा आग्रह झाला. (इति-ढवळे) घाईघाईने काही कवि जमले. मुंबईचे हल्लीचे (पट्टीचे) अध्यक्ष श्री. मं. वि. राज्याध्यक्ष हे स्थानी (स्व) बसले. वास्तविक अध्यक्ष नेहमी शेवटी बोलतात. (पद्धत–कां कुणास ठाऊक?) पण आपल्यानंतर कार्यक्रमातले 'काव्य' जाऊन त्याला खुलाशा–प्रतिखुलाशाचे 'राजकारणी' स्वरुप येणार हे आधी कळल्यामुळे म्हणा किंवा (काय की वा?) राजाध्यक्ष आधी बोलले. सत्कारप्रसंगी थोडे, समर्पक पण मर्मज्ञ भाषण करण्यात राज्याध्यक्ष (व त्यांच्यातला अध्यक्षही) चांगलेच 'तय्यार' झाले आहेत. बोरकरांच्या कवीतेचा विकास त्यांनी शब्दाने चांगला टिपला. मग ज्ञानेश्वर नाडकर्णी यांच्या नांवाचा पुकारा झाला! मी नाही–मी नाही, असा चेहरा करीत (व आता काय बोलू, कसं बोलू अशी विवंचना मनात वागवीत) ज्ञानेश्वर नाडकर्णी बोलू लागले. त्यांचे शब्द सूर शोधीत फिरत होते. थोडचा फार कवितांचा इकडचा तिकडचा उल्लेख करून मग नाडकर्णी कोकणी व माशांवर घसरले. गोवा संमेलनाचा (त्या) रम्य आठवणीही नाडकर्णींच्या मनात तरळून गेल्या. वाणी जड झाली होती (खाणे वगैरे जास्त झाले होते का?) शेवटी सभेत हवी तशी 'हवा' आपण भरू शकत नाही ह्या विदारक जाणीवेमुळे (च) की काय ज्ञानेश्वरांनी 'गोवा–महाराष्ट्र' 'मराठी–कोकणी' वादावर बोरकरांना (व सभेलाही) डिवचले. लोक खुर्च्यावर सावरून बसले. मग वा. रा. ढवळे (माजी संपादक ज्योत्स्ना, साहित्य परिषदपत्रिका वगैरे) बोलले (त्यांच्या पुढचा 'बोंबल्या' काढला का नव्हता मंडळी?) मी–संपादक आणि ज्योत्स्ना यांच्या उल्लेखातून मधुनमधुन बोरकरांच्या कवितेची चिकित्सा होत होती. बैठकी खूप झाल्या पण बैठकीतल्या बोरकरांच्या व्यक्तित्वाचे दर्शन ढवळ्यांकडून अपेक्षित होते. संबंध खूप आहेत हे 'कळत' होते. पण 'जाणवत' मात्र नव्हते. ढवळे हे शाकाहारी शुद्ध असल्याने (असे वाटते) मासे, गोवा–कोकणी वगैरे वादात ते शिरले नाहीत (तेच बरे) शेवटी बोलले वसंतराव देशमुख! मंडळी हा उमद! माणूस त्या दिवशी फार उमदेपणाने बोलला. वसंतराव गोव्याला जाऊन आले (आणि सिकेराची डोकेदुखी उठली) गोव्याला वसंतरावांनी शासकीय सेवा काय काय केली–आपल्याला काय करायचंय? पण गोव्याच्या वास्तव्यात हा माणूस खूप "पिऊन" (अनुभव मंडळी–फक्त अनुभवच म्हणायचंय मला) आलाय् हे मात्र त्या दिवशी जाणवत होतं. 'दाद' द्यायला 'दिल्' लागतो, 'दिल्!' रसिकाचा 'दिल्!!' वसंतराव देशमुखांनी जे भाषण केले ते नाटकी वाटले असेल (जशी ज्याची दृष्टि) पण नाटकी नव्हते! 'महात्मायन'बाबतचा दम सुद्धा (दम देऊन कविता होते?) मायेपोटी आला होता...गोव्यातल्या सहवासातल्या 'स्वप्निल' रात्री वसंतरावांच्या डोळ्यातून चांदणे बरसून गेल्या!! बहोत खूब, वसंतराव!!

आपल्याला तर भैया हा माणूस ठासून भरल्यासारखा वाटला. बोरकरांनी सत्काराला उत्तर देतांना ज्ञानेश्वर नाडकर्णीना सूत्रबद्ध उत्तर दिले. 'स्वत्व सोडू नका, सख्य तोडू नका' आता राजकारण हा काही आपला प्रांत नाही म्हणा! पण भाषा समृद्ध होण्यासाठी 'वेगळेपण' हवेच असा सिद्धांत मानला तर त्याच तत्वावर विदर्भ, मराठवाडा, खानदेश, कोकणपट्टी वगैरे प्रांत हवेतच नाही का? जाऊ द्या झालं! फार 'डीप' चाललोय् का मी? तूर्त आपण 'सख्य' राखूया! कविवर्य बोरकरही तसंच म्हणताहेत!!

नंतर कविसंमेलन झाले. जुने+नवे. शांता शेळके, वृंदा लिमये, पाडगांवकर, वि. ज. बोरकर, पु. शि. रेगे वगैरे मंडळी आली. त्यांनी बोरकरांना (काव्यमय) मानाचा मुजरा केला हेही नसे थोडके!!

**--बन्याबापू**

---

**[पृष्ठ १० वरून—कीचक]**

लग्न घाल..... हे असावे तरी कोण?.... पण कोणी का असेना.... किंमत आहे ती माणसाच्या गुणाची, ज्ञानाची. त्याच्याविषयीच्या इतर तपशीलाशी आपल्याला काय करायचं आहे? स्वतःच्या पावलाबरोबर मुलांना पावलं टाकायला सांग... थांब, तू नको मीच सांगतो.... त्यांच नांव काय म्हणालीस?

**सु**:—बृहन्नल! विराटनगरीतील नाटचाचार्य कीचकांची कीर्ति ऐकून इथं यावसं वाटलं असे ते म्हणाले. त्यांना इथं आल्याला अद्याप वर्ष काही झालं नाही. स्वाऱ्यांवर गेल्यावर अजिंक्यपद मिळवण्याखेरीज नाटचाचार्य म्हणूनहि तुझी ख्याति काही कमी नाही. तुझं नांव ऐकून ते इथं आले तर तू नेहमीप्रमाणं स्वारीवर गेला होतास. तू येईपर्यंत नृत्यशिक्षक म्हणून काम करण्याची संधि मिळेल का, अशी त्यांनी पृच्छा केली.. त्यांचं बोलणं ऐकून पहिल्यांदा मला हसूच आवरेना. माझ्या भावाच्या अनुपस्थितीत हे नाटचाचार्य म्हणवून घेणार! कीचकाऐवजी दुसरे नाटचाचार्य.....! हे थट्टा तर करीत नाही ना, अमंच मला प्रथम वाटलं...परंतु त्यांच्या विनंतीत प्रामाणिकपणा होता. तुला ठाऊकच आहे की आपल्या इथं जे कोणी येतात त्यांना आपण कोण, कुठले इत्यादि मूर्खासारखे प्रश्न विचारून कधीच सतावत नाही. पाहुण्यांना आपण प्रश्न विचारतो तो फक्त एकच–'या भूमीवरील लोकांचे कल्याण साधण्यासाठी तुम्ही काय करू शकाल?' आमच्या लोकांचे कल्याण होईल अशी खात्री झाली, की त्यांचे आपण नेहमीच स्वागत करतो....मी हा प्रश्न या नाटचाचार्यांनाहि केला नि त्यांनी त्यांना अवगत असलेल्या भाषत – नृत्यातील पदविन्यासांनी उत्तर दिलं! यांच्या नृत्याचा थाट आगळाच होता. मी तर क्षणभर थक्कच झाले. तुझ्याजवळ पूर्वी मीहि थोडंफार शिकले आहे.. यांचं नृत्य पाहून मलाहि स्फूर्ति आली.. पूर्वस्मृति चाळवल्या गेल्या.. आणि म्हणूनच त्यांचं कौशल्य जाणून मी, तुझ्या अनुपस्थितीत, मुलांच्या शिक्षणाची आबाळ होऊ नये म्हणून त्यांना शिक्षण देण्यासाठी यांना विनंती केली... माझी योजना तुला आवडेल अशी माझी खात्रीच होती...

**[क्रमशः]**

## संगीत ( पण गद्य ) वासवदत्ता

**झोपता** काय मंडळी? आणि उठून काय चाललात? अहो, हे मराठी नाटक आहे. संस्कृत नाटक नाही. पाटी पाहिलीत? 'स्वप्न' शब्द शब्दापुरता तरी आहे का बघा बरं? नाही ना? चक्क लिहिलंय् 'संगीत वासवदत्ता'! होय! होय! भासाच्या "स्वप्न वासवदत्ता" ह्या मूळ संस्कृत काव्यात्म व श्रेष्ठ कलाकृतीचीच ही मराठी आवृत्ति ( असे म्हणतात ) बसा मंडळी! धीर धरा!! हं! पडदा वर गेला. ( नाही तर वाजूला समजा ) वीणा वाजवीत तुमच्या माझ्याकडे पाठ करून बसला आहे ना तोच राजा उदयन! याने नाटकाचा हीरो! ती वीणा घोषवती! वीणेच्या सुमधुर ('टेप'मधून येणाऱ्या) स्वरात मन रंगलंय् ना? सुरात रंगा पाठ असली म्हणून काय झालं? अरेच्चा! टेप संपली वाटतं? ( की उदयनच्या वीणेवर घड्याळ ठेवलं होतं? ) राजा उठला! 'वासवदत्ते' हा शब्द त्याने उच्चारला मात्र! माझ्या तर भैया साऱ्या तारा तुटल्या!! काय डिलिव्हरी आहे. वासवदत्तेचा हा प्रेमळ नवरा—काव्यात्म वृत्तीचा—स्वप्नाळू स्वभावाचा दिसला—भासला तसा— पण तसा बोलला मात्र नाही! त्या नटाचा मूळ आवाजच तसा आहे का हो? असल्यास इलाज नाही. नसल्यास मात्र दिग्दर्शिकेला जबाबदार धरावं लागेल! नंतर येतो विदूषक—राजाचा मित्र—मित्रच तो – मग मित्रासाठी राजा चक्क उभा राहतो. आणि विदूषक याने तो मित्र बसून बोलतो. कल्पनेत तरी रुचतं, पटतं का हे? पहिल्या अंकात वासवदत्ता येते. नंतर वासवदत्ता व उदयन बोलत राहतात. खांब, आसने, आपापल्या जागी. आता बराच वेळ जर दोघांनाच बोलायचे होते तर मग ही 'खडी ताजीम' कशासाठी? राजा-राणी बोलत राहतात. प्रेक्षकांना फार 'टेन्शन' जाणवू नये म्हणून मग गडी येतो. वर्दी देतो. अमात्य आणि यौगंधरायण (सेनापति) आल्याचे सांगतो. "कशाला ही अडचण?" असा राजाचा चेहरा. गडी परत—पुन्हा दोनच पात्रे—मग गडी येतो. पुन्हा तेच. पुन्हा संवाद—मग शेवटी अमात्य आणि यौगंधरायण आत येतात ( किती वेळ वाट पहायची त्यांनी तरी ) आत आल्यावर ते राजाचे कुशल विचारायच्या ऐवजी वा राजाला आपला मुद्दा कौशल्याने पटवून देण्याऐवजी एकदम राजकारणी 'व्याख्यानबाजी' सुरू करतात. राजा निघून जातो (मृगयेचे निमित्त करून ) आणि मग 'नाटकातले नाटक' ठरते. अमात्य वगैरे मंडळी निघून जातात. आग लागते (असे म्हणतात) आणि राणी वासवदत्ता जळून मेली असा पुकारा होतो.

विमनस्क राजा ( कोहीच्या मते त्या नटाचा चेहरा तसाच आहे ) दुसऱ्या अंकात अमात्यांच्या वकिलीने मगधाची राजकन्या पद्मावती हिच्याशी 'राजकारणी' लग्न लावण्याची कल्पना मान्य करतो—निघतो. रणांगणावरच्या तंबूत वावरणाऱ्या सैनिकांच्या तलवारी व इतर शस्त्रे आकाराने 'पुराण' कालीन असली तरी वजनाने भलतीच 'लाईट' होती बुवा ( टेक इट लाइटली—नाटकात माणसे थोडी मारायची होती ? )



तिसऱ्या अंकात बराच मसाला आहे. 'शारदा' टाइप ( त्याच वयाच्या हे विशेष ) पद्मावतीच्या सख्या आहेत. लताकुंजातले वागणे आहे. (लताकुंजाचा सीन चांगला ) अ. भा. कितींचे नृत्य दिग्दर्शक लच्छू महाराज यांनी पद्मावतीला (ललिता केंकरे) दिलेले अत्यंत प्राथमिक नृत्यपाठ आहेत. मगध सम्राट दिसतात ( पण जाणवत नाहीत ) वाङनिश्चय आहेत पण लग्न नाही. मग उदयनाचा पराक्रम ( ऐकायचा आपण ) आनंदी आनंद. मग अमात्य, यौगंधरायण येतात. सारे राजकारण चुटकीसरसे 'एक्सपोज्' होते. राजा (लढून ) दमल्यामुळे शयन महालात येतो. ( दोन भिंती प्रेक्षणीय—किती चित्रं होती त्या दोन भिंतीवर. दोनच भिंती असल्याने सारी कला तेथे ओतली गेली होती म्हणा की ) त्याला 'घोषवती' परत मिळते. मग वासवदत्ता (ही) भेटते. शेवट गोड! 'स्वप्न वासवदत्ता'मधील सुविख्यात 'स्वप्न' इथे राजालाच पडत नाही, तर तुम्हाला दिसणार कुठून ? त्या मूळ नाटकातले सारे काव्य, स्वप्निल वातावरण इथे अभावानेच जाणवते. राजकारणाचा फार स्थूल संबंध मूळ नाटकात आहे. ह्या नाटकात सारे प्रचलित राजकारण आहे. हे सारे 'रचलेले' नाटक आहे. 'दुसरा पेशवा' ह्या नाटकात बाजीराव व चिमाजी अप्पा याचे 'लोकनेता' ह्या विषयावरच्या संवादांची आठवण होते. अर्थातच इथे भाषा 'उणे' आहे. ह्या नाटकातले अमात्य व यौगंधरायण हे जर 'सूत्रधार' आहेत तर त्यांच्या व्यक्तिरेखा अधिक स्पष्ट व्हायला हव्या होत्या असे वाटते. विदुषकाला किती न्याय? त्याच्या खाण्याची किती चर्चा? शेवटी तो 'भाव' खाऊन जातो ( भलताच ) हे नाटक अखेर उदयन—वासवदत्ता—पद्मावतीचे आहे; पण ह्या तीन्ही व्यक्तिरेखा 'जीव' धरीत नाहीत. मूळ नाटकात 'हवे तसे' ( हव्वे तसे म्हणण्याइतपत ) बदल केल्याने व शतानीकप्रमाणेच फार 'राजकारणी' सोस धरल्याने मूळ नाट्यकृतीतील काव्यात्मता व काव्यात्म शैली नाटकाने गमावली आहे. राजकारणाने काव्य खाऊन टाकले आहे. खाडिलकर होण्याच्या हव्यासात भासावर मात्र अन्याय झाला आहे खास!

उदयन ( अरविंद पिळगावकर ), वासवदत्ता ( सौ. सुहासिनी मुळगावकर) ह्या दोघांना गाणी आहेत. त्यातली काही गाणी बऱ्या चालींमुळे रंगलीही. पण ही गाणी ऐकत असताना तुम्हाला मत्स्यगंधा, ययातीची व रामदास कामतांची आठवण आली की नाही मंडळी? मला आली बुवा! कुणी तरी चेष्टेने म्हणत








होतं की विंगेत रामदास कामतच बसले होते गायला! पण तो भासच! पिळगावकर 'बरे' गायले असले तरी रामदास कामतांची सर नाही! बाई जितेंद्रांच्या संगीताला स्वच्छ व स्पष्ट शब्दोच्चारांची ( योग्य ) साथ देत नाहीत त्यामुळे गाणे ( व चालीही ) गोड असूनही अपेक्षित रसाविष्कार होत नाही. त्यांचे काम चांगले होते. भावदर्शन चांगले. त्यांच्या नवीन प्रकारच्या वेषभूषेमुळे त्यांची उंची 'खुपली' नाही. खपली. शोभूनही दिसली. त्या मेहनती आहेत. पण गाणे 'रंगत' नाही अजून हे खरे! अरविंद पिळगांवकराना चाली पेलताना कष्ट होतात ( असे वाटते ) त्यामुळे त्यांचा आवाजही मधूनच चिरकतो (लोक चित्कारतात) सर्वात चांगले काम विठ्ठल पणदुरकर यांचे ( विदुषक ) विश्वास कुंटे बोलतात–दिसतात चांगले ( अमात्य ) पण सतत 'दक्ष'मध्येच उभे राहून बोलले पाहिजे काय? चांगला माणूस लाभूनही लेखक-दिग्दर्शकानी त्याला वाया घालविले आहे. पद्मावतीला "अॅट द मर्सी ऑफ वासवदत्ता" सोडून दिले आहे. मूळ नाटकात विचारीचे लग्न होते. इथे मात्र नुसतेच वाङ्‌निश्चय–अपुरे!! ह्या नाटकाचा एकच भाग चांगला. ह्या निमित्ताने मराठी रंगभूमीला सौ. सुहासिनी मुळगावकर यांच्या सारखी सुविद्य–गायक व अभिनयाची जाण असलेली–प्रयत्नशील कलावंत लाभली. 'एकपात्री'तून त्यांना 'वासवदत्ते'ने बाहेर काढले हे तिचे यश! सौ. मीना पेठे ह्यांचे कसब नेपथ्य–वेषभूषेत जाणवले. दुसऱ्या अंकातल्या तंबूपेक्षा 'दुसरा पेशवा'त १२–१५ वर्षापूर्वी साहित्य संघाने कितीतरी चागला 'तंबू–सेट' उभा केला होता त्याचे स्मरण होते. जितेंद्र अभिषेकी आता स्थिरावत आहेत. त्यांनी आपल्याच पूर्वीच्या चाली चोरल्याचा आभास उत्पन्न होऊ देऊ नये. अभिषेकींच्या जवळ असामान्य कला आहे. थोर गायकीचा हा धनी! मग हे असे भास–आभास हवेत कशाला? मोठ्या आशेने आम्ही पहात आहोत–म्हणून हे असं लिहिलं!!

## चित्रपट महोत्सव-पारितोषिके

महाराष्ट्र शासनाच्या वतीने आयोजित केल्या जाणाऱ्या वार्षिक चित्रपट महोत्सवाच्या पांचव्या वर्षीच्या मानकऱ्यांना यंदा महाराष्ट्र दिनाच्या निमित्ताने शासनाच्या मुख्य मंत्र्यांच्या हस्ते पारितोषिके देण्याचा समारंभ पार पडला. समारंभ भलत्याच थाटात पार पडला. रंगभवनाच्या गल्लीच्या प्रवेशद्वारापासून हा थाट जाणवत होता. कार्यक्रमाला केंद्रीय नभोवाणी मंत्री के. के. शहा (मुंबईकरच) उपस्थित होते. यंदाच्या मानकऱ्यांपैकी प्रमुख मानकरी होते भालजी पेंढारकर. (चार पांच बक्षिसे) त्यांनी आपली प्रतिनिधी म्हणून आपल्या पत्नीला मुद्दाम पाठविले होते ( सुप्रसिद्ध अभिनेत्री लीला ) त्यांना व्यासपीठावर बसविण्यातही आले होते ( कशाला मग ? ) पण भालजींच्या वतीने सारी पारितोषिके घेतली उषा मंगेशकरने! 'ही म्हातारी बाई कोण हो? तिला तिथे कशासाठी बसवले आहे?' असा प्रश्न 'जन्ता' विचारीत होती. हुमण्यांनी विचकत-वाचकत 'गौप्य-स्फोट करतो' म्हणून जसा 'आनंदघन' म्हणजे 'लता' असा परिचय करून दिला तसा लीलाबाईना भालजींची पारितोषिके देऊन लीलाबाईंचा परिचय आजच्या सिनेरसिकांना कां बरे करून दिला नाही. ( हुमण्यांच्या हातून खरं म्हणजे असं होत नाही ) अनंत माने 'पुढारी' झाले होते. ( अगदी पोषाखात सुद्धा ) त्यांनी 'मागणे लई न्हाई म्हणत म्हणत बरीच गाऱ्हाणी मुख्यमंत्र्यांच्या कानी घातली. शहा थोडे बोलले. पण फार परिणामकारक व 'इंटेलीजंटली' बोलले. विनोदी बुद्धीने बोलले. मंडळी, जरा दमादमाने घ्या! स्वराज्य मिळायला दीडशे वर्षे लागली. 'सुराज्या'चा "ट्रिक सीन" माने–माडगुळकरांच्या चित्रपट व्यवसायातसुद्धा इतक्या झटपट कसा घेता येणार? 'लोकमान्य तंत्र' ठेवा ध्यानात!' "जे मिळेल ते घ्या आणि अधिक मागा!!"

— चित्रगुप्त

[ पृष्ठ ४६ वरून–संस्कृत विनोद ]

सासऱ्याचा असा राग हाच काही शंकरासमोरचा प्रश्न नाही. त्याचा संसार कसा आहे पहा.

"स्वयं पंचमुखः पुत्रौ गजाननषडाननौ
दिगंबरः कथं जीवेत् अन्नपूर्णा न चेग्दृहे ॥'

"अरे या शंकराला दोन पुत्र. एक गजानन. एवढ्या मोठ्या पोटाचा आणि हत्तीप्रमाणे सोंडेने बकाबक खाणारा. दुसरा षडानन हा सहा तोंडानी खाणारा. यांच्या पोटाला घालता घालता बिचाऱ्याची पंचाईत होते. प्रत्यक्ष अन्नपूर्णाच घरात आहे म्हणून बरे"

महान व्यक्तींच्या हालचालीचा पुकार करण्याची पद्धती आहे. कुंभकर्णाच्या चोपदारांचा हा पुकारा पहा.

"रे रे लोकाः कुरुध्वं श्रवणपुटपिधानं
द्रुतं हस्तयुग्मैः
शैलाः सर्वेऽपि यूयं भवत गुरुतराः सावधाना धरित्र्याम् ॥
शीघ्रं रे रावण त्वं विरचय वसनैः
नासिकानां पिधानम्
सुप्तोऽयं कुंभकर्णः कटुविकटं शर्धते
दीर्घमुच्चैः ॥"

"रे रे, लंकापुरनिवासी पौरजनहो, आपल्या दोन्ही हातानी कानाची भोके बंद करा. हे लंका द्वीपस्थ पर्वत हो, हे द्वीप हवेत उडून जाईल तरी आपले वजन वाढवून त्यावर दबाव द्या. अरे रावणा, पळ पळ. तुझी दहा नाके. वीस नाकपुड्या. आधी त्यात वस्त्रे कोंब. हा निद्रापती कुंभकर्ण महाराज अपानवायूचा महा भयानक स्फोट करणार आहे."

संस्कृत विनोदकाराना कुठचाही विषय चालत असला तरी सुदैवाने कुंभकर्णाच्या असल्या लीलांवर विनोद करण्याचा मोह त्याना फारसा झालेला नाही. हा मोह त्याना पडता तर प्रत्यक्ष ऋग्वेदातील वृषाकपि सूक्तापासून ज्या संस्कृत विनोदाचा आरंभ आहे त्याची प्रगती थिल्लरतेत आणि परिणती जुगुप्सेत होती. सुदैवाने हे टळलेले आहे. •••






REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment JUNE 1967

DIPAVALI MONTHLY



COVER PRINTED AT ASHA PRINTERY, BOMBAY-4